# उपोद्घात

[ लेखकः—डॉ. शि. रा. रंगनाथन्, एम् ए, डी लिट्, एल् टी,
एफ् एल् ए ]

## [ मराठी रूपांतर ]

श्री र. श. पारखी हे नवभारताच्या पुरोगामी ग्रथपालांपैकीं एक आहेत. ज्यानीं आपलें सर्व आयुष्य ग्रथालयव्यवसायात निरालसपूर्वक व अखड वेचलें आहे अशा काहीं थोड्या ग्रथपालांपेकीं ते एक आहेत. त्याना हें स्थान मिळविण्यास स्वत.चा उदोउदो किंवा इतराची कृपा कारणीभूत झाली नाहीं. ते पूर्णपणें स्वयसिद्ध आहेत. त्यानीं निवळ दृढ कष्टानें, अनन्य भावानें व ग्रथालयाच्या उद्दिष्टावरील निष्ठेनें भारतीय ग्रथपालनव्यवसायाच्या इतिहासात आपलें स्थान सपादन केलें आहे.

ग्रथपालनव्यवसायाच्या भारतीय पद्धतीवर श्री. पारखी याची श्रद्धा आहे अशा श्रद्धेनें कार्य करणें गतकालात सोपें नव्हतें आपणास राजकीय स्वातन्त्र्य मिळालें आहे तरी तें अद्यापि सोपें झालेलें नाहीं. व्यवसायातल्या पूर्वग्रहदूषित व्यक्ति पाश्चिमात्य निरुपयोगी पद्धतींच्या विकृत प्रकाराचें अवलबन करीत आहेत व त्याचा प्रचार करून अजूनहि लोकाची दिशाभूल करीत आहेत. परतु स्वत.च्या बढतीसाठीं अशा सोप्या मार्गाचा अवलब करून आपल्या सचोटीचा भग करणें पारखींना आवडत नाहीं.

श्री पारखी याची आणखी अशी इच्छा आहे कीं, भारताला ग्रथालय-जगांत मानाचें स्थान मिळावें. भारत जेवढें मिळवितो त्यापेक्षा किंचितहि कमी त्यानें देऊ नये अशी त्याची इच्छा आहे. म्हणून त्यानीं ग्रथालयशास्त्रावर अनेक ग्रथ लिहिले आहेत. हा आणखी एक ग्रथ आहे. ह्यात द्विबिन्दु वर्गीकरणाचें ( *Colon classification* ) विवरण केलें आहे. ही पद्धति भारतांत निर्माण झाली आहे परतु ती सर्वत्र उपयोगात आणण्याजोगी आहे.

द्विबिन्दु वर्गीकरणाची कल्पना इ. स. १९२४ नोव्हेंबर मध्यें सुचली. ज्ञानविश्वाच्या गतिमूलक विकासाच्या वाढीमुळें दशांश वर्गीकरण पद्धति (*Decimal classification*) त्रोटक व अपुरी ठरल्यानें तिची प्रेरणा झाली. नवीन प्रकारची रचना असलेल्या पद्धतीची आवश्यकता स्पष्ट झाली. मुखमूलक रचना (Faceted structure) हा एक उपाय आहे, असें लक्षात आलें तिचा अवलंब केल्यानें विभाजन-संयोजनक्षम पद्धतीचा (analytico-synthetic scheme) जन्म झाला परिगणनात्मक पद्धतीपेक्षा (enumerative scheme) ही वेगळी आहे. इतर सर्व विद्यमान पद्धति तत्त्वतः परिगणनात्मक आहेत पारखी यानीं भारतीय वर्गीकरण-पद्धतीच्या नवीन घडणीचें विवेचन केलें आहे.

गेल्या तीस वर्षांत द्विबिन्दु वर्गीकरणात सतत सुधारणा होत आल्या आहेत. विद्यमान वर्गांकात काहींहि बदल करावें न लागता ज्ञानविश्वात होणाऱ्या नवीन विस्ताराला तोंड देण्याकरिता नवीन सुधारणा करण्याचें तत्त्व ह्या पद्धतीनें मान्य केलें आहे ह्याचें कारण असें आहे कीं, काल (Time), स्थल (Space), ऊर्जा (Energy), वस्तु (Matter) आणि व्यक्तित्व (Personality) ह्या मूलभूत प्रकारातून( *Fundamental Categories*) तिचा प्रत्यक्ष रीतीनें उगम झालेला आहे. ह्या बाबतींत, प्रत्यक्ष नैसर्गिक खडकापर्यंत पोहोंचविलेल्या पायावर बांधलेल्या इमारतीसारखी ही पद्धति आहे श्री. पारखी यानीं ह्या भारतीय पद्धतींचें हें तेजस्वी लक्षण विशद केलें आहे.

द्विबिन्दु वर्गीकरण हें स्वय-शाश्वतपद्धतीचें (self-perpetuating scheme) ज्ञात असें बहुतांशीं जुळणारें अचूक उदाहरण आहे. तीमध्यें विपुल परिवर्तनशीलता (versatility) आहे. तिनें आपल्या अंग (Phase) मुख (Facet) आणि मंडल (Zone) याच्या तंत्रातून हा गुण मिळविला आहे. ग्रंथपाल व सूक्ष्मविषय संदर्भ सेवातज्ज्ञ (Documentalists) याच्या सप्टेंबर १९५५ मध्यें ब्रुसेल्स येथें भरलेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेंत आंतरराष्ट्रीय सूक्ष्मविषय संदर्भ सेवा संघानें (International Federation for Documentation) भारताच्या द्विबिन्दु-

वर्गीकरणातून निर्माण झालेल्या मुख पृथक्करणाच्या ( Facet Analysis ) दिशेनें भविष्य कालात वर्गीकरण प्रगत व्हावें लागेल हें तत्त्व मान्य केलें आहे वस्तुत ह्या मार्गाचा अवलंब करण्याकरिता तिनें ठराव समत केले आहेत

द्विबिन्दु वर्गीकरण साधारण स्वरूपाच्या ग्रथाना लहान वर्गांक देते ह्यामुळें सार्वजनिक ग्रथालयें, विद्यालयीन व महाविद्यालयीन ग्रथालयें याना ती विशेषेकरून उपयोगीची झाली आहे आपल्या ग्रथालयातून उपयोगात आणण्यास ती सोपी आहे

सारात्मक कालिकें ( Abstracting periodicals ) आणि सशोधन सस्थाच्या, व्यवसायमडळाच्या व सरकारी खात्याच्या ग्रथालयातून होणाऱ्या सूक्ष्मविषय सूचिकरणासाठीं ( Documentation work ) आवश्यक अशा सूक्ष्म वर्गीकरणाची ( Depth classification ) मागणी पुरविण्यास इतर कोणत्याहि पद्धतीपेक्षा द्विबिन्दु वर्गीकरण जास्त पात्र आहे

वैद्यक, अध्यात्मविद्या, भाषाशास्त्र, धर्म, तत्त्वज्ञान व न्याय ह्या विषयावरील भारतीय आर्षग्रथाचे करिता कोष्टकें तयार करण्याचे बाबतींत के महामहोपाध्याय प्रा एस कूपस्वामि शास्त्रियार याच्या अगाध ग्रथविद्या ज्ञानाचा फायदा द्विबिन्दु वर्गीकरणाला मिळाला ह्या कोष्टकात प्रत्येक मूळ आर्ष ग्रथानतर त्याचे टीका ग्रथ, उपटीका ग्रथ याच्या सपूर्ण परपरागत ग्रथाची रचना उपयुक्त नात्यानुसारी केलेली आहे हें द्विबिन्दु वर्गीकरणाचें विशेष लक्षण इग्रजी न जाणणाऱ्या ग्रथपालाना व भारतातील पडिताना उपलब्ध करून देण्याचें कार्य पारखी करीत आहेत

द्विबिन्दु वर्गीकरणाचीं उपयुक्त लक्षणें भारताच्या विचार आणि उच्चार याच्या परपरेमुळेंच निर्माण झालीं आहेत बीज अक्षर परपरेचा बीजमूलक स्मृतिसाधनावर ( Seminal mnemonics ) व कोष्टकात अतर्भूत झालेल्या स्मृतिसाधनावर ( Scheduled mnemonics ) परिणाम झाला आहे सूत्र-पद्धतीचा तिच्या विवरणावर व तिच्या परपरेतील इतर मूलग्रथावर परिणाम झाला आहे The *Classified catalogue code* ह्या मूळ इग्रजी

ग्रंथाच्या "अनुवर्ग सूचि कल्प" ह्या नांवाच्या संस्कृत व हिंदी रूपांतरित ग्रंथातील सर्व नियम पूर्णपणें संस्कृत सूत्रांत दिलेले आहेत

भारताच्या पुनरुज्जीवनाचें प्रस्तुत कालचक्र ऊर्ध्वगामी अवस्थेंत आहे म्हणून आता सर्व देशभर सार्वजनिक ग्रंथालयाचें जाळें प्रस्थापित करणें अत्यावश्यक आहे संपूर्णपणें सुसयन्त्रित व सविस्तर अशा व्यावसायिक शिक्षणाचा लाभ मिळविलेल्याचें पुरेसें मनुष्यबळ निर्माण करण्यात येईपर्यंत आपण थांबणें उचित होणार नाहीं इ स १९५३ मध्यें प्रसिद्ध झालेल्या ग्रंथालय प्रक्रिया सारख्या (*Library manual*) पुस्तकाच्या साहाय्यानें ग्रंथालयाची व्यवस्था पाहण्याची पात्रता निर्माण होण्याइतपत ज्याना थोडेसे आठवडे शिक्षण मिळालें आहे, अशा व्यक्तींचा भरणा कित्येक वर्षे आपल्या बऱ्याच ग्रंथालयांतून करावा लागेल वर निर्दिशित केलेलें प्राथमिक पुस्तक केवळ ह्याच उद्देशानें प्रसिद्ध करण्यात आलें होतें

भारताच्या सार्वजनिक आणि विद्यालयीन ग्रंथालयाना तयार केलेल्या द्विबिन्दु वर्गीकाच्या तक्त्याचा बराच उपयोग होईल ह्या व्यावहारिक गरजेकडे पूर्ण लक्ष ठेवूनच पारखी यानीं हा ग्रंथ तयार केला आहे तयार वर्गीकाच्या तक्त्यात ज्या विषयाचा अंतर्भाव झालेला नाहीं अशा विषयाना वर्गीक तयार करणें ग्रंथपालाना शक्य व्हावें म्हणून त्यानीं पुरेशी तांत्रिक माहितीसुद्धा दिलेली आहे

भारताच्या सामान्य वाचकाला रोमी वर्ण समजणार नाहींत अशी परिस्थिति लोकरच निर्माण होईल ह्या संभाव्य घटनेचा आगाऊच विचार करून आपल्या ग्रंथालयानीं आपल्या स्वत च्या वर्णाचा वर्गीकरणात उपयोग करणें अगत्याचें आहे श्री पारखी यानीं द्विबिन्दु वर्गीकात देवनागरी वर्णाचा उपयोग केला आहे महान् पाणिनि यानीं वर्णाची पद्धतिबद्ध केलेली रचना आणि त्याच्या वर्गाची घटण ह्या गुणद्वयामुळें देवनागरी अंकन (notation) जास्त सामर्थ्यवान् झालें आहे

जवळच्या भावी काळात भारताच्या शेंकडों सार्वजनिक आणि विद्यालयीन ग्रंथालयातील ग्रंथपालांना इंग्रजी समजणार नाहीं म्हणून ग्रंथालयशास्त्रावर

आपल्या स्वकीय भाषातून ग्रंथ लिहिण्याची सध्याची उचित वेळ आहे. ह्याकरिताच माझ्या Library manual ह्या पुस्तकाचें "ग्रंथालय प्रक्रिया" ह्या नावाचें हिंदी रूपांतर इ स १९५३ मध्यें करण्यात आलें श्री पारखी यानीं आता वर्गीकरणावर हें मराठी पुस्तक तयार करून प्रसिद्ध केलें आहे

माझ्या पुण्याच्या भेटीमुळें महाराष्ट्रीय लोकाच्या अमर्याद देशाभिमानाची मला प्रत्यक्ष माहिती करून घेता आली भारताच्या राष्ट्रिय परपरेंत जें काहीं चिरकाल मोलाचें आहे त्याचेविषयीं त्याना वाटणारा मोठा आदर मी तेथें पाहिला आहे भारतात निर्माण होणाऱ्या पद्धतींचा अवलंब करण्याचे बाबतींतील त्याची उत्सुकता पाहून माझ्या मनावर विशेष परिणाम झाला. ते आपली भाषा औत्सुक्यानें कशी समृद्ध करतात हें मी पाहिलें आहें. अतएव भारतीय ग्रंथालयपद्धतीवर भारतीय भाषातून प्रथमच प्रकाशित होणारीं पुस्तकें मराठींतील आहेत यात नवल नाहीं पारखी याचें उदाहरण आपल्या देशात सर्वत्र अनुसरण्यात यावें असें मी इच्छितों भारताच्या इतर भाषिक भूखंडातील ग्रंथालयव्यवसायाला अशा प्रकारचीं पुस्तकें आपापल्या भाषातून निर्माण करण्यास त्यामुळें उत्तेजन मिळो. आपल्या मातृभूमींतील आपल्या व्यवसायबधूचें हें कर्तव्य आहे

ज्या महाराष्ट्र समाजानें पारखी याचेसारखा उत्साही ग्रंथालयभक्त निर्माण केला त्याला माझें अभिनंदन महाराष्ट्रात आत्मीयतेनें ग्रंथालयव्यवसायात काम करणारे ग्रंथपाल निर्माण व्हावेत म्हणून त्या समाजाला माझी अशी प्रार्थना आहे, कीं त्यानें पारखी याचे ग्रंथ, त्याच्या सूचना व त्याचें काम याचा पूर्णपणें उपयोग करून घ्यावा आपल्या मातृभूमींतील ग्रंथालयाचें उद्दिष्ट साध्य करण्याकरिता कराव्या लागणाऱ्या कार्याचे बाबतींत श्री पारखी याचेसारखा लायक मित्र मिळाल्याबद्दल मला आनद होतो.

२४८ हॉफ वीझेनस्ट्रास, झूरिच ५७, स्विट्झर्लंड

एस् आर रंगनाथन्
१२ डिसेंबर १९५५

# प्रस्तावना

[ लेखक :—श्री. त्र्यं. दि. वाकनीस, बी ए (ऑन.) एफ् एल् ए.,
ग्रंथाधिपाल, मुंबईराज्य ]

श्री. पारखी हे ग्रंथपालनशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या मराठी भाषिकांत सर्वांत अधिक मुरलेले ग्रंथपाल आहेत. ह्या अभ्यासाची संथा त्यांना श्री. रंगनाथन् ह्यांजकडून १४ वर्षापूर्वी मिळाली. श्री रंगनाथन् ह्यांनीं ग्रंथपालन-विद्येला भारतांत मानाचें स्थान मिळवून दिलेलें आहे व दुनियेंत आपल्या वैशिष्ट्यपूर्ण वर्गीकरणपद्धतीनें भारतीयांच्या मूलग्राही पांडित्याचें दर्शन घडविलें आहे. श्री. पारखी हे श्री. रंगनाथन् ह्यांचे अव्यभिचारी भक्तीचे अनुयायी आहेत. रंगनाथी वर्गीकरणाच्या उत्क्रान्त होत जाणाऱ्या स्वरूपाचें चिंतन, मनन व परिशीलन श्री. पारखी ह्यांनीं ज्या श्रद्धेनें व नेटानें केलें आहे ती श्रद्धा व तो नेट इतर मराठी भाषिक ग्रंथपालांनीं क्वचितच दाखविला आहे.

श्री. पारखी ह्यांच्या दीर्घ मननाचा व प्रत्यक्ष कार्याचा परिपाक म्हणून त्यांचा हा वर्गीकरणावरील ग्रंथ असामान्य महत्त्वाचा ठरेल ह्यांत शंका नाहीं. श्री. रंगनाथन् ह्यांना आपली वर्गीकरणपद्धति समजावून सांगतांना इंग्रजी-सारखी समृद्ध भाषासुद्धां अपुरी पडली व त्याचें विवरण सकाळच्या धुक्यांत दडलेल्या रम्य वनश्रीसारखें आकर्षक पण अस्पष्ट राहिलें. श्री. पारखी यांना तें स्वतःला स्पष्ट करून घेऊन मराठी वाचकांना सुबोध भाषेंत सांगावयाचें होतें. त्यांचा प्रयत्न संपूर्णपणें सफल झाला असें म्हणणें धाष्टर्याचें होईल. पण तशी अपेक्षा करणें व्यर्थ आहे. शास्त्र व साहित्य ह्यांवर सारखेंच प्रभुत्व असणाऱ्या सव्यसाची धनुर्धारीलाच ह्या अजजड धनुष्याला दोरी बांधणें शक्य होईल.

मराठी भाषिक ग्रंथपालांना एका स्वदेशी वर्गीकरणपद्धतीची माहिती देण्याचा त्यांचा उपक्रम अभिनंदनीय आहे. विचारांना चालना मिळाली. विषयावर माहितीपूर्ण चर्चा सुरू झाली तरी ग्रंथाचा कार्यभाग झाला आहे

असें म्हणतां येईल. ग्रंथाचें तात्त्विक अधिष्ठान न समजणाऱ्यांना सुद्धां ह्या ग्रंथाचा उपयोग होईल. श्री. पारखी ह्यांनीं सामान्यपणें ग्रंथालयांत येणाऱ्या पुस्तकांचे विषय व त्यांच्या संज्ञा ह्या पुस्तकांत कोष्टकरूपानें दिल्या आहेत व विषयांची मांडणी कोष्टकांत वर्गानुक्रमानें व वर्णानुक्रमानें अशा दोन्हीं क्रमानें दिली आहे.

पाश्चात्यांनीं शोधून काढलेल्या सर्व वर्गीकरणपद्धतींत, पौरस्त्य विषयांची गठडी न उलगडतां एकाच वर्गाच्या कोठडींत कोंडली जात असे. रंगनाथी वर्गीकरणांत प्रत्येक विषयाला व विषयाच्या शाखेला स्वतंत्र अस्तित्व व मोकळेपणा मिळाला आहे, हें ह्या पद्धतीचें ढोबळ वैशिष्टय आहे. तिचीं इतर वैशिष्टयें समजण्यास सूक्ष्म अभ्यासाची जरूरी आहे. श्री. पारखी ह्यांनीं तीं यावच्छक्य बालबोध करण्याचा प्रयत्न केला आहे.

भारतांत रंगनाथी पद्धतीवर अनेक वर्षे इतकी चर्चा झाली कीं, कित्येकांचे मतें त्या चर्चेमुळें भारतीय ग्रंथालयचळवळीला बद्धकोष्ठता आली. ह्या आरोपाचा इन्कार किंवा पाठपुरावा भविष्यकाळ करील. इतकें खरें कीं, वर्गीकरण हें साधन आहे. एकाद्या विषयावरील पुस्तकांचा किंवा पुस्तकान्तर्गत ज्ञानाचा शोध घेण्याचें तें एक साधन आहे. पण ' साधनानाम-नेकता ' असतांना एकाच पंथाचें घोडें पुढें दामटणें जसें धर्मान्धतेचें ठरतें तसें वर्गीकरणपद्धतीचें होऊं नये असें अनेक ग्रंथपालांचें प्रामाणिक मत आहे.

रंगनाथी पद्धति महाराष्ट्रांत सर्वत्र उपयोगिली जावी ह्यासाठीं तिचें तात्त्विक व व्यावहारिक दर्शन सतत घेत राहणें हें अत्यावश्यक आहे; *व त्याच दृष्टीनें श्री. पारखी ह्यांचा ग्रंथ मराठी वाचकांच्या सेवेला हजर होत* आहे. तो त्यांची मैत्री व आदरभाव मिळविण्यास समर्थ होवो असें मी मना-पासून इच्छितों.

दि. १९-१०-१९५६

त्र्यं. दि. वाकनीस
क्यूरेटर ऑफ लायब्ररीज,
मुंबई राज्य

# ग्रंथकाराचें निवेदन

इ. स. १९३२ च्या वसंत-ग्रीष्मऋतूंत मद्रास विद्यापीठाच्या ग्रंथालयांत डॉ. रंगनाथन् यांचे मुखांतून ग्रंथालयशास्त्राचें शिक्षण मिळविण्याचा बहुमूल्य लाभ मिळाल्यापासून त्यांच्या द्विबिन्दु वर्गीकरण पद्धतीचा अभ्यास लेखकानें गेलीं २४ वर्षे सतत चालू ठेवला आहे. इ. स. १९२५ पासून फर्ग्युसन कॉलेजच्या ग्रंथालयांत डॉ. ड्यूए यांच्या दशांश वर्गीकरण पद्धतीप्रमाणें तेथील ग्रंथांचें वर्गीकरण करण्याचें कार्य चालू ठेवलें होतें व द्विबिन्दु वर्गीकरण पद्धतीचें शिक्षण मिळाल्यावर वर्गीकरणशास्त्राचा व ग्रंथालयांतील वर्गीकरणाचा तौलनिक अभ्यास लेखकानें कित्येक वर्षे केल्यावर त्याची अशी खात्री झाली कीं, जगातील सध्यांच्या मान्यता पावलेल्या सर्व वर्गीकरण-पद्धतींत द्विबिन्दु वर्गीकरण पद्धति उच्च दर्जाची असून सामान्य ग्रंथालया-पासून संशोधन-संस्थांच्या ग्रंथालयापर्यंत सर्व ग्रंथालयांना पूर्णत्वानें उपयोगी पडणारी आणि विशेषतः भारताच्या विशिष्ट वाङ्मयाच्या वर्गीकरणास योग्य अशी ही एकमेव वर्गीकरणपद्धति आहे.

प्रस्तुत ग्रंथ लिहून प्रकाशित करण्याचा हेतु आज कित्येक वर्षे मनांत होता. त्याला आतां मूर्तस्वरूप मिळत आहे यामुळें लेखकास विशेष आनंद होतो.

हा ग्रंथ तयार करतांना अनेक लहानमोठ्या ग्रंथालयांच्या गरजांचा विचार केलेला आहे. त्यांतील चर्चा जरी मराठींतून केलेली आहे तरी वर्गांक व कित्येक विषयांचे पारिभाषिक शब्द मूळ इंग्रजी व रूपांतरित मराठी दिल्यामुळें ह्या ग्रंथाचा उपयोग सर्व प्रकारच्या ग्रंथालयांना व्हावा अशी अपेक्षा आहे. तयार वर्गांकांचा तक्ता तयार करतांना डॉ. रंगनाथन् यांच्या (१) Suggestions for the organisation of libraries in India (1946), (२) Library manual (1951) व (३) Classification of Marathi Literature (1945) ह्या ग्रंथांतील तयार वर्गांकांच्या तक्त्यांचा उपयोग केला आहे. सहाव्या प्रकरणापासून

ह्या पद्धतीची तांत्रिक माहिती जितकी विशद रीतीनें व सोप्या भाषेंत देतां आली तेवढी दिली आहे. ही माहिती सर्वसाधारण ग्रंथालयांपासून संशोधन-संस्थांच्या ग्रंथालयांतील सूक्ष्म विषयांच्या वर्गीकरणाला लागणाऱ्या माहिती-पर्यंत देण्याचा प्रयत्न केला आहे. डॉ. रंगनाथन् यांनीं आतांपर्यंत वर्गीकरणा-वर जे ग्रंथ लिहिले आहेत व जे निरनिराळे लेख प्रकाशित केले आहेत त्यांतून ही सर्व माहिती घेतलेली आहे.

ग्रंथालय संघ व विद्यापीठें यांनीं ग्रंथालयशास्त्राचे जे वर्ग चालविले आहेत त्या वर्गांतील शिक्षणाकरितां सुद्धां ह्या ग्रंथाचा उपयोग होईल अशी आशा आहे.

ह्या ग्रंथाचा दुसरा भाग तयार करण्याचें काम चालू आहे. त्या भागांत प्रत्येक वर्गाचीं मुखपरिसूत्रें, त्यांचीं संपूर्ण कोष्टकें, वर्गांक तयार करण्या-करितां आवश्यक असलेले नियम व वर्गांकांचीं विविध उदाहरणें अशी माहिती देण्याचा उद्देश आहे. तो ग्रंथ प्रकाशन करण्याची संधि ग्रंथकाराला मिळाली तर बऱ्याच ग्रंथालयांना त्याचा चांगला उपयोग करावयास मिळेल व ह्या पद्धतींचा मुख्यत्वें महाराष्ट्रांत व आतां हिंदी ही राष्ट्रभाषा झाल्यामुळें व हिंदीचे नागरी वर्ण व मराठीचे नागरी वर्ण एकच असल्यामुळें अखिल भारतांत प्रसार होण्यास बरीच मदत होईल असें वाटतें.

इतर व्यवसायबंधूंचे या बाबतींत प्रयत्न चालू आहेतच. असे अनेकांनीं प्रयत्न करावयास पाहिजेत. अशा प्रयत्नांमुळें ह्या विषयाची जागृति होण्यास चांगली मदत होते व प्रयत्नांच्या विविधतेमुळें त्या विषयाच्या अभ्यासकांना असे प्रयत्न उपयुक्त ठरतात.

भारताची राष्ट्रीय ग्रंथसूचि व भारताच्या घटकराज्यांतील प्रकाशनांच्या सरकारकडून प्रकाशित होत असलेल्या सूचि यांचें वर्गीकरण ह्या पद्धतीप्रमाणें करण्याची व्यवस्था व्हावयास पाहिजे. अशा सूचींचा बहुविध ग्रंथालयांना फार उपयोग होतो; व त्या द्विबिन्दु वर्गीकरण पद्धतीनें वर्गीकृत केल्या तर सर्व-साधारण ग्रंथालयांतील वर्गीकरणाचा प्रश्न अगदीं सोपा होईल व सर्व ग्रंथालयांतील वर्गीकरणांत एकसूत्रता निर्माण होईल. हा वर्गीकरणाचा प्रश्न अखिल भारत राष्ट्राचा प्रश्न म्हणून विचारांत घ्यावयास हवा व तो

उत्तम प्रकारें सोडविला जावा म्हणून सर्वांच्या कडून शक्य तेवढे प्रयत्न व्हावयास हवेत.

लेखकानें गेलीं ३५ वर्षे ग्रंथालयव्यवसायांत जी कांहीं अल्पस्वल्प सेवा केली ती करण्याचें सुभाग्य त्याला डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या माननीय चालकांच्या औदार्यामुळें व त्यांनीं वारंवार दिलेल्या उत्तेजनामुळेंच मिळूं शकलें. फर्ग्युसन कॉलेजच्या महत्त्वपूर्ण ग्रंथालयांतील विपुल ग्रंथभांडाराचें शास्त्रीय पद्धतीनें वर्गीकरण करण्याची व तेथील कामांत अर्वाचीन प्रचलित पद्धतीप्रमाणें सतत सुधारणा करण्याची संधि तेथील चालकांनीं दिल्यामुळें लेखकाला ( १ ) पुणें येथील शेतकी कॉलेज, ( २ ) मुंबईराज्याचें महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय, पुणें, ( ३ ) राजस्थान विद्यापीठ ग्रंथालय, जयपूर, ( ४ ) बॉबे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटीचें ग्रंथालय, मुंबई आणि ( ५ ) सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी व गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संशोधनसंस्था यांचें ग्रंथालय या ग्रंथालयांतून शास्त्रीय पद्धतीनें वर्गीकरण करण्याची व तेथील इतर कामांत सुसूत्रता निर्माण करण्याची संधि मिळाली. अशा अनेक अमूल्य संधींमुळेंच ग्रंथकाराला डॉ. रंगनाथन यांची द्विबिन्दु वर्गीकरण पद्धति व पाश्चिमात्य प्रमुख वर्गीकरण पद्धति याचा दीर्घकाल सखोल अभ्यास करतां आला. म्हणून वरील संस्थांच्या चालकांविषयीं आदरपूर्वक कृतज्ञता दाखविणें हें ग्रंथकाराचें प्रथमकर्तव्य आहे.

ग्रंथकाराचें आदरणीय गुरुजी डॉ. शि. रा. रंगनाथन् यांचेकडे नोव्हेंबर १९५५ मध्यें ह्या ग्रंथाची संक्षिप्त रूपानें माहिती पाठवून त्यांना उपोद्घात लिहिण्याची विनंति करतांच त्यांनीं तातडीनें तो लिहून पाठविला ह्याबद्दल ग्रंथकार त्यांचा ऋणी आहे.

मुंबई राज्याचे माननीय ग्रंथाधिपाल श्री. रा. रा. त्र्यं. दि. वाकनीस यांनीं ग्रंथकाराला तीन वर्षांपूर्वी त्याच्या मुंबईच्या वास्तव्यात द्विबिन्दु वर्गीकरण पद्धतीवर मराठींत सोप्या भाषेंत सविस्तर ग्रंथ प्रकाशित करावयास पाहिजे अशी इच्छा प्रदर्शित केली होती; व त्यांना या ग्रंथाचें हस्तलिखित परीक्षणार्थ दिल्यावर तें चिकित्सक रीतीनें वाचून कांहीं महत्त्वाच्या

सूचना केल्या व ग्रंथकाराच्या विनंतीवरून आपली प्रस्तावना लिहून दिली याबद्दल ग्रंथकार त्यांचा कृतज्ञ आहे.

पुणें येथील भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन संस्थेचे विद्वद्वर्य क्यूरेटर डॉ. प. कृ. गोडे यांनीं ग्रंथाचें हस्तलिखित वाचून पुणें विद्यापीठाला मदतीकरितां ग्रंथकारानें जो अर्ज पाठविला त्याचेबरोबर पाठविण्यासाठीं ग्रंथाविषयींचें व ग्रंथकाराविषयींचें मतप्रदर्शनपर आपलें शिफारसवजा पत्र दिलें याबद्दल ग्रंथकार त्यांचा फार आभारी आहे.

हा ग्रंथ गेलीं तीन वर्षें तयार करीत असतांना मुंबई राज्याचे उपग्रंथाधिपाल मित्रवर्य श्री. रा. रा. कृ. ग. भागवत यांनीं विशेष आपुलकी दाखविली व वेळोवेळीं ग्रंथाची उपयुक्तता वाढविण्याचे दृष्टीनें महत्त्वपूर्ण सूचना केल्या व अनेक प्रकारें मदत केली याबद्दल ग्रंथकार त्यांचा ऋणी आहे.

वरील सद्‌गृहस्थांप्रमाणेंच ग्रंथकाराला अनेक व्यवसायबंधूंचें वेळोवेळीं जें साहाय्य मिळालें त्याबद्दल ग्रंथकार सर्वांचा फार आभारी आहे.

ग्रंथांत जे कांहीं दोष राहिले असतील त्या सर्वांबद्दल ग्रंथकार स्वतः पूर्णपणें उत्तरदायी आहे. शक्य तितकी दक्षता घेऊनसुद्धां ग्रंथांत कांहीं मुद्रणदोष राहिले आहेत. त्यापैकीं जे दोष ग्रंथकाराच्या नजरेस आले ते ग्रंथाचे शेवटीं दिलेल्या शुद्धिपत्रांत दाखविले आहेत. ह्या सर्व दोषांबद्दल वाचक व टीकाकार यांनीं क्षमा करावी अशी त्यांना ग्रंथकाराची नम्र विनंति आहे.

आर्यभूषण छापखान्याचे संचालक व व्यवस्थापक यांनीं ग्रंथ छापण्याचें काम सुबकरीतीनें व्हावें म्हणून दाखविलेली दक्षता व तत्परता याबद्दल ग्रंथकार त्यांचा आभारी आहे.

ग्रंथाच्या प्रकाशनासाठीं पुणें विद्यापीठानें उदार आर्थिक साहाय्य केल्याबद्दल ग्रंथकार पुणें विद्यापीठाचा कृतज्ञ व ऋणी आहे.

मकरसंक्रांत,
दि. १४ जानेवारी, १९५७

र. श. पारखी

# अनुक्रमणिका

प्रकरण पृष्ठें

प्रकरण १ लें

# डॉ. रंगनाथन् यांचा अल्प परिचय

भारतांतील ग्रंथालय चळवळीचे कर्णधार शियाळी रामामृत रंगनाथन् यांचा जन्म मद्रास प्रांताच्या तंजावर जिल्ह्यांतील शियाळी गांवांत दि. ९ ऑगस्ट सन १८९२ मध्यें झाला. त्यांचें शालेय शिक्षण इ. स. १८९८ ते १९०८ पर्यंत शियाळी येथील हिंदू हायस्कूल ह्या संस्थेंत झालें. शालेय शिक्षणानंतर त्यांनीं महाविद्यालयीन शिक्षणाकरितां मद्रास ख्रिश्चन कॉलेजमध्यें इ. स. १९०९ मध्यें प्रवेश मिळविला. त्यांना बी. ए. ह्या पदवीपरीक्षेच्या इंग्रजी वाङ्मय ह्या विषयांत प्रथमश्रेणी मिळाली. त्यांनीं लहानपणापासून संस्कृत वाङ्मयाचें अध्ययन उत्तम प्रकारें केलें होतें व संस्कृतमध्यें स्वतंत्र निबंध लिहिण्याची त्यांनीं संवय लावली होती. त्यांनीं एम्. ए. च्या परीक्षेकरितां गणित हा ऐच्छिक विषय घेतला होता व त्या परीक्षेंत उच्च श्रेणी मिळवून ते इ. स. १९१६ मध्यें उत्तीर्ण झाले; व त्यांनीं लगेच टीचर्स कॉलेजमध्यें प्रवेश मिळविला. इ. स. १९१७ मध्यें ते अध्यापनशास्त्राची एल्. टी. ही परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांनीं मद्रास सरकारच्या शिक्षण खात्यांत नोकरी मिळवून गणिताचे प्राध्यापक म्हणून गव्हर्नमेंट कॉलेज, मद्रास (१९१७-२०) व प्रेसिडेंसी कॉलेज, मद्रास (१९२०-२३) या दोन महाविद्यालयांत अध्यापनाचें काम केलें. ते गणिताचे प्राध्यापक असतांना त्यांना असें आढळून आलें कीं, त्यांच्या महाविद्यालयांत गणित हा विषय विद्यार्थ्यांना आकर्षक करण्याचे प्रयत्न करण्यांत येत नव्हते. त्यामुळें त्या विषयाकडे बरेंच विद्यार्थी दुर्लक्ष करीत होते. ही उणीव भरून काढण्यासाठीं त्यांनीं त्यांच्या महाविद्यालयाच्या ग्रंथालयांत गणितावरील नवीन नवीन ग्रंथ आणविले व ते विद्यार्थ्यांना दाखवून त्यांचें महत्त्व पटवून दिलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, चोखंदळ विद्यार्थी ग्रंथालयांतील गणितांच्या ग्रंथांचा उपयोग अधिकाधिक करूं लागले व त्या महाविद्यालयांत गणित हा विषय आवडणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढूं लागली. तसेंच गणित हा

ऐच्छिक विषय घेऊन आपल्या परीक्षेंत उच्च श्रेणी मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्याहि बरीच वाढली. ही गोष्ट शिक्षण खात्याच्या प्रमुखांचे नजरेस येतांच त्यांनीं प्रा. रंगनाथन् यांना धन्यवाद दिले.

दि. ४ जानेवारी १९२४ रोजीं त्यांची मद्रास विद्यापीठग्रंथालयाचे पहिले ग्रंथपाल म्हणून नेमणूक झाली व त्यांना लंडन येथील ब्रिटिश म्यूझियम-मधील ग्रंथालयांतर्गत कामाच्या पद्धतींची माहिती करून घेण्यासाठीं पाठविण्यांत आलें. तेथें गेल्यावर ब्रिटिश म्यूझियमच्या डिरेक्टरनें लंडन विद्यापीठाच्या स्कूल ऑफ् लायब्ररियनशिप येथें शिक्षण घेण्यापासून होणाऱ्या फायद्यांची त्यांना माहिती दिल्यावरून त्यांनीं त्या संस्थेंत प्रवेश मिळविला. परंतु तेथें ग्रंथालयशास्त्राचें वर्गीकरण, सूचिकरण व ग्रंथालयव्यवस्था हे विषय सोडून लॅटिन वाङ्मय, इंग्रजी वाङ्मय व इतर युरोपियन व आशियांतील वाङ्मयाच्या अभ्यासावर विशेष भर दिला जातो हें पाहून व त्या विषयांच्या अभ्यासाची त्यांना मुळींच आवश्यकता नसल्यामुळें त्यांचें वर्गीकरण शास्त्राचे गुरु डब्ल्यू. सी. बर्विक सेयर्स यांच्या सूचनेप्रमाणें त्यांनीं त्या संस्थेंत फक्त ग्रंथालयशास्त्राच्या विषयांचें अध्ययन करावयाचें ठरविलें व इतर वेळांत *निरनिराळ्या ग्रंथालयांतील कामकाजाची माहिती घेण्याचें* व क्रॉयडन येथील सार्वजनिक ग्रंथालयांत उमेदवार म्हणून प्रत्यक्ष काम करण्याचें ठरविलें. हा कार्यक्रम त्यांनीं एक वर्षभर तेथें चालू ठेवला. लंडनमधील त्यांच्या वास्तव्यांत त्यांनीं बर्विक सेयर्स साहेब यांचे मार्गदर्शनाखालीं

(१) डॉ. मेलव्हिल डयूए यांची जगन्मान्य दशांश वर्गीकरण पद्धति (The Decimal Classification),

(२) जेम्स् डफ् ब्राऊन यांची विषय वर्गीकरण पद्धति (The Subject Classification),

(३) चार्लस ॲमी कटर यांची विस्तृत वर्गीकरण पद्धति (Expansive Classification), व

(४) *युनायटेड स्टेट्सच्या लायब्ररी ऑफ् काँग्रेसची वर्गीकरण पद्धति* (The Library of Congress Classification)

ह्या पाश्चात्य राष्ट्रांत नांवाजलेल्या वर्गीकरणपद्धतींचा सखोल अभ्यास केला. हा त्यांचा अभ्यास चालू असतांना त्यांना असें आढळून आलें कीं ह्या

चारी पद्धतींत कांहीं मूलभूत दोष आहेत व त्यांच्यांत सुधारणा करण्याचे प्रयत्न संबंधित अधिकाऱ्यांकडून चालू आहेत. तसेंच ह्या पद्धतींपैकीं एकहि पद्धत सद्यःकालीन सुदीर्घ विस्तृत ज्ञानाच्या शाखोपशाखांच्या वर्गीकरणाला व विशेषतः भारतांतील विशिष्ट ज्ञानभांडाराच्या वर्गीकरणाला पूर्णत्वानें उपयोगाची नाहीं. अशा अनेक कारणांनीं त्यांचें ठाम मत झालें कीं अशी एक नवीनच वर्गीकरणपद्धति तयार करावी कीं, जी जगांतील सर्व वाङ्मयाचें वर्गीकरण करण्यास पूर्णत्वानें योग्य ठरेल व भारतांतील विशिष्ट वाङ्मयाच्या वर्गीकरणास लागणारे आवश्यक गुण तीमध्यें असूं शकतील. प्रथमतः त्यांनीं या बाबतींत डॉ. ड्यूए यांचा सल्ला घेतला; परंतु त्यांनीं डॉ. रंगनाथन् यांना असें सांगितलें कीं सर्वांत शहाणपणाचा मार्ग म्हणजे त्यांच्या दशांश-वर्गीकरणपद्धतीचाच स्वीकार भारतांतील वाङ्मयाच्या वर्गीकरणाकरितां करावा व तीमध्यें कोणतेहि फेरफार करूं नयेत. डॉ. ड्यूए यांचा हा उपदेश साहजीकच डॉ. रंगनाथन् यांना पटला नाहीं. सेयर्स साहेब यांनीं डॉ. रंगनाथन् यांना नवीन पद्धति तयार करण्यांत व ती पूर्णत्वास नेण्यांत कशा अनेक अडचणी निर्माण होतील याबद्दल प्रथम नीट विचार करावा असा उपदेश केला. डॉ. रंगनाथन् यांनीं ह्या दोन्हीं अधिकारी व्यक्तींच्या उपदेशाचा विचार करून नवीन वर्गीकरणपद्धति तयार करण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें इंग्लंडहून भारताकडे परत येतांना बोटींतच त्यांच्या द्विबिन्दु वर्गीकरण पद्धतीचा ( Colon Classification scheme ) आराखडा तयार झाला. पुढें जुलै १९२५ मध्यें मद्रासला परत आल्यावर डॉ. रंगनाथन् यांनीं त्या पद्धतीप्रमाणें मद्रास विद्यापीठाच्या ग्रंथालयाचें वर्गीकरण करण्यास सुरवात केली. इ. स. १९३३ पर्यंत त्यांचे त्या पद्धतींत सुधारणा करण्याचे प्रयत्न सतत चालू होते. त्या वर्षीं त्यांनीं मद्रास ग्रंथालयसंघाच्या विद्यमानें त्या पद्धतीची प्रथम आवृत्ति प्रसिद्ध केली.

दि. ३० जानेवारी १९२८ रोजीं त्यांनीं मद्रास ग्रंथालय संघाची स्थापना केली व डिसेंबर १९२८ मध्यें अलमल्लाय विद्यापीठांत १००० शिक्षकांचे पुढें ग्रंथालयशास्त्रावर व्याख्यानें दिलीं. इ. स. १९२९ मध्यें त्यांनीं मद्रास ग्रंथालयसंघाचा ग्रंथालयशास्त्र शिक्षणाचा वर्ग सुरू केला. पुढें त्या वर्गाचें रूपांतर मद्रास विद्यापीठाच्या ग्रंथालयशास्त्र शिक्षणवर्गांत झालें. इ. स.

१९३७ पर्यंत ह्या वर्गाचा शिक्षण-काळ तीन महिन्यांचा होता. तेव्हांपासून इ. स १९४४ पर्यंत त्यांनीं मद्रास विद्यापीठांत पदवीधरांचेकरितां प्रमाण-पत्राचा ( Diploma ) एक वर्षाचा ग्रंथालयशास्त्राचा वर्ग चालविला.

हें त्यांचें कार्य चालूं असतांना त्यांच्या वर्गीकरणपद्धतींत सुधारणा करण्याचे त्यांचे प्रयत्न सतत चालले होते. इ. स. १९४५ मध्यें डॉ. राधाकृष्णन् हे बनारस हिंदु विद्यापीठाचे उपकुलगुरु असतांना त्यांनीं डॉ. रंगनाथन् यांना त्या विद्यापीठाच्या ग्रंथालयाची पुनर्रचना व पुनर्व्यवस्था करण्याकरितां मुद्दाम निमंत्रण दिल्यावरून त्यांनीं मद्रास विद्यापीठाच्या ग्रंथालयांतून निवृत्त होऊन बनारस विद्यापीठाचें काम स्वीकारलें. इ स. १९४५ व ४६ या दोन वर्षांत त्या ग्रंथालयांत आमूलाग्र सुधारणा करण्याचे त्यांनीं अतोनात प्रयत्न केले व तेथें पदवीधरांकरितां प्रमाणपत्राचा ग्रंथालयशास्त्राचा वर्ग चालविला. इ. स. १९४७ मध्यें सर मॉरिस ग्वायर हे दिल्ली विद्यापीठाचे उपकुलगुरु असतांना त्यांनीं डॉ. रंगनाथन् यांना त्या विद्यापीठाच्या ग्रंथालयाची पुनर्रचना व पुनर्व्यवस्था करण्यासाठीं मुद्दाम निमंत्रण दिलें व त्यांची त्या विद्यापीठांत ग्रंथालयशास्त्राचे प्राध्यापक व ग्रंथालय सल्लागार म्हणून नेमणूक केली. त्या विद्यापीठांत त्यांनीं ( १ ) पदवीधरांकरितां ग्रंथालय-शास्त्राच्या प्रमाणपत्राचा एक वर्षाचा शिक्षणक्रम, व ( २ ) ग्रंथालय-शास्त्राच्या एम्. एल्. एस्सी. ह्या पदवीपरीक्षेचा दोन वर्षांचा शिक्षणक्रम असलेले दोन वर्ग चालविले. तसेंच ग्रंथालयशास्त्राची पीएच्. डी. ह्या उच्चतम पदवीकरितां कांहीं विद्यार्थ्यांनाहि त्यांनीं मार्गदर्शन केलें.

डॉ. रंगनाथन् यांनीं २७ वर्षें ग्रंथालयशास्त्राच्या अध्यापनाचें कार्य आदर्श पद्धतीनें केलें. ते इंग्लंडमध्यें हें शिक्षण घेण्यास जेव्हां गेले तेव्हां त्यांना ह्या शास्त्राचें अध्यापन करणाऱ्या कित्येक शिक्षकांत एक विशेष उणीव दृष्टीस पडली. ती ही कीं, अध्यापनाचा विषय नीट अभ्यासून तो विद्यार्थ्यांचे मनावर बिंबविण्याइतका परिणामकारक रीतीनें शिकविण्याकडे दुर्लक्ष केलें जात असे. त्यामुळें ग्रंथालयशास्त्राचें शिक्षण अगदीं कमी मतीचें म्हणून लेखलें जात होतें. तशीच स्थिति सध्यां आपल्या भारतांत आहे असें खेदानें म्हणावें लागतें. ग्रंथालयांत ग्रंथपाल वाचकांना स्वतंत्रपणें आपलें ज्ञानार्जन करण्याकरितां व तें वाढविण्याकरितां जीं संदर्भ साधनें निर्माण करतो व

ग्रंथांची रचना शास्त्रोक्तपद्धतीनें करून ती सोयीची व उपयुक्त करण्याचे जे प्रयत्न करतो व शिवाय त्यांना आपुलकीनें जें संदर्भ साहाय्य करतो... अशा ग्रंथपालाच्या विविध कामगिरीला शिक्षकानें वर्गांत केलेल्या अध्यापनापेक्षां पुष्कळ पटीनें अधिक मोल आहे. वर्गांत मिळविलेलें शिक्षण परावलंबी असतें तर ग्रंथालयांत ग्रंथांचे सान्निध्यांत मिळालेलें शिक्षण पूर्ण स्वावलंबी असतें व त्यामुळें अभ्यासकांना स्वावलंबी करण्यांत तें अधिक यशस्वी व श्रेयस्कर ठरतें. याकरितां ग्रंथालय शास्त्राचें अध्यापन अत्यंत शास्त्रोक्तपद्धतीनें व्हावयास पाहिजे व त्याकरितां शिक्षकांकरितां अध्यापनवर्ग चालवून जसें अध्यापक तयार करण्यांत येतात तसेंच ग्रंथालयशास्त्राचे अध्यापनवर्ग चालवून तें शिकविणारे शिक्षक तयार केले पाहिजेत ही गोष्ट त्यांनीं ग्रंथालय-व्यवसाय-बंधूंच्या नजरेस आणण्याकरितां "Teaching of Library Science" ही लेखमाला भारतीय ग्रंथालयसंघाच्या *ABGILA* (Vol, 3 Nos. 1 & 2-1953) ह्या नियतकालिकांत प्रसिद्ध केली आहे.

डॉ. रंगनाथन् यांनीं ग्रंथालयशास्त्रांतर्गत बहुतेक सर्व विषयांवर आतांपर्यंत ४० ग्रंथ प्रकाशित केले आहेत व हजारों लेख प्रसिद्ध करून ह्या शास्त्राचें महत्त्व बहुजन समाजाला पटविण्याचे प्रयत्न केले आहेत.

इ. स. १९३३ मध्यें भारतीय ग्रंथालयसंघाची स्थापना त्यांच्याच पुढाकारानें झाली व इ. स. १९४७ ते १९५३ पर्यंत ते त्या संघाचे अध्यक्ष असताना संघाच्या कार्यांत त्यांनीं बराच जिवंतपणा निर्माण केला; संघाची सांपत्तिक स्थिति उत्तमप्रकारें सुधारली; संघाचीं स्वतंत्र प्रकाशनें प्रकाशित केलीं व ॲबगिला (*ABGILA*) हें संघाचें ग्रंथालयशास्त्रावरील प्रथम श्रेणीचें नियतकालिक भरभराटीस आणलें. डॉ. रंगनाथन् यांनीं अखिल भारताकरितां व भारतांतील कांहीं संघटक राज्याकरितां ग्रंथालयकायद्याची योजना तयार केली. तसेंच त्यांनीं अखिल भारताकरितां व कांहीं संघटक राज्यांकरितां ग्रंथालय प्रसारयोजना सुद्धां तयार करून प्रसिद्ध केली.

दि. ७ मार्च १९४८ रोजीं डॉ. रंगनाथन् यांच्या ग्रंथालयशास्त्रावरील व ग्रंथालयचळवळीवरील मौलिक कामगिरीबद्दल त्यांना दिल्ली विद्यापीठानें आपल्या भारताचे माननीय पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू व माननीय शिक्षणमंत्री मौलाना अबुल कलम आझाद यांचे समक्षेत

डॉक्टर ऑफ् लेटर्स ही बहुमानाची पदवी अर्पण केली. तसेंच इ स. १९४८ पासून निरनिराळ्या पाश्चिमात्य राष्ट्रांत त्यांना मुद्दाम निमंत्रण करून त्यांची व्याख्यानें व त्यांच्याशीं विचारविनियम करण्यांत येत आहे. त्यांच्या द्विबिन्दु-वर्गीकरण पद्धतीनें तर ग्रंथालयवर्गीकरण शास्त्रांत विशेष उल्लेखनीय क्रांति घडवून आणली आहे. असे हे डॉ. रंगनाथन् यांचें चरित्र पाहिल्यावर त्यांना भारतांतील *ग्रथालयचळवळीचे पिताजी* ( Father of Library Movement in India ) असें त्यांचे एतद्देशीय व्यवसायबंधुंना व तसेंच परकीय देशांतील व्यवसायबंधुंना वाटत असल्यास नवल नाहीं. ग्रंथालयांचे सुधारणेचे बाबतींत भारतानें सर्व जगांत उच्च स्थान मिळवावें ही त्यांची महत्त्वाकांक्षा सफल करण्यास त्यांना भारतांतील सर्व व्यवसायबधूनीं अंतःकरणपूर्वक साहाय्य करणें इष्ट आहे.

---

प्रकरण २ रें

# ग्रंथांचें वर्गीकरण
व
# द्विबिन्दु-वर्गीकरण-पद्धति

## ग्रंथांची रचना

ग्रंथांचें वर्गीकरण हा अर्वाचिन ग्रंथालयांतील एक अत्यंत महत्त्वाचा विषय होऊन बसला आहे. याला मुख्य कारण सतत होणारी ग्रंथांची वाढ व त्याच-बरोबर ग्रंथालयांचा उपयोग करून घेणाऱ्या वाचकांची वाढ ग्रंथालयांतलें सर्व काम वाचकांच्या सोयी व वाङ्मयाचे बाबतींत त्यांच्या आवडी-निवडी याकडे लक्ष देऊन करण्यांत येतें. ह्या सर्व कामांत वाचकांचा प्रत्यक्ष संबंध ग्रंथांशीं विशेष येत असल्यामुळें त्यांची रचना सदैव वाचकांच्या सोयीची असेल असा प्रयत्न करणें हें ग्रंथपालाचें मुख्य काम आहे.

## ज्ञानाचें वर्गीकरण व ग्रंथांचें वर्गीकरण

ग्रंथांच्या वर्गीकरणाचें मूळ ज्ञानाच्या वर्गीकरणांत आहे; कारण ग्रंथांमध्यें ज्ञानाच्या शाखोपशाखांचा विचार केलेला असतो. यामुळें ज्ञानाचें वर्गीकरण व ग्रंथांचें वर्गीकरण यांमध्यें अगदीं निकटचा संबंध आहे. शतकानुशतकें ज्ञानाचें क्षेत्र जसें वाढत चाललें आहे तशा ग्रंथांच्या वर्गीकरणाच्या पद्धतींतहि सारख्या सुधारणा कराव्या लागत आहेत. एका शतकांत उत्तम ठरलेली वर्गीकरणपद्धति दुसऱ्या शतकांत निरुपयोगी ठरते. म्हणूनच ग्रंथांच्या वर्गीकरणांत सारखी क्रांति घडून येत आहे. ग्रंथपालांना वाङ्मयनिर्मितींत सतत चालू असलेली वाढ व त्याच्या अनुरोधानें वाचकांच्या गरजांमध्यें होत असलेला फरक यांकडे सारखें लक्ष पुरवावें लागतें; व त्याप्रमाणें ग्रंथांच्या वर्गीकरणांत काय बदल व सुधारणा करावयास हव्यात याबद्दल त्यांना सदैव विचार करावा लागतो; व ज्ञानाच्या सर्व बाजूंनें होत असलेल्या

वाढीचा बारकाईनें अभ्यास करावा लागतो; कारण त्यांना ग्रंथालयातली ग्रंथांची रचना नेहमीं वाचकांच्या गरजा पुरविण्यास कार्यक्षम ठेवावी लागते.

## सर्वसामान्य वर्गीकरण पद्धति

ही ग्रंथपालांची अडचण दूर करण्यासाठीं एकोणीसाव्या शतकाच्या शेवटल्या कालखंडापासून आतापर्यंत अमेरिका, इंग्लंड व भारत ह्या तीन राष्ट्रांत पुढील सर्वसामान्य अशा वर्गीकरण पद्धति निर्माण करण्यांत आल्या.

(१) डॉ. मेलव्हिल ड्यूए (Melvil Dewey) यांची दशांश वर्गीकरण पद्धति (Decimal Classification). १८७६.

(२) चार्लस ॲमी कटर (Charles Ammi Cutter) यांची विस्तारशील वर्गीकरण पद्धति (Expansive Classification). १८९७.

(३) जेम्स् डफ ब्राऊन (James Duff Brown) यांची विषय-वर्गीकरण पद्धति (Subject Classification). १९०६.

(४) लायब्ररी ऑफ् कॉंग्रेसची वर्गीकरण पद्धति (Library of Congress Classification). १९१०.

(५) सर्वसामान्य दशांश वर्गीकरण पद्धति (Classification Decimale Universelle, Brussels). १९२७.

(६) डॉ. शियाळी रामामृत रंगनाथन् यांची द्विबिन्दु वर्गीकरण पद्धति (Colon classification). १९३३.

(७) हेन्री एव्हेलिन ब्लिस (Henry Evelyn Bliss) यांची वाङ्मय रचना वर्गीकरण पद्धति (Bibliographical classification). १९३५.

वरील वर्गीकरण पद्धतींपैकीं (१) डॉ. ड्यूए यांची दशांश वर्गीकरण पद्धति (२) सर्वसामान्य दशांश वर्गीकरण पद्धति (३) डॉ. रंगनाथन् यांची द्विबिन्दु वर्गीकरण पद्धति व (४) ब्लिस यांची वाङ्मयरचना वर्गी-करण पद्धति– ह्या पद्धति विशेष उल्लेखनीय आहेत.

## डॉ. ड्यूए यांची दशांश वर्गीकरण पद्धति

डॉ. ड्यूए हे अमेरिकेंतलि अर्वाचीन ग्रंथालयचळवळीचे जनक होत. त्यांचा जन्म न्यूयॉर्क राज्याच्या जेफर्सन परगण्यांत ॲडॅम्सेंटर या गांवीं

डिसेंबर १०, १८५१ ह्या दिवशीं झाला. त्यांचें शिक्षण इ. स. १८७४ मध्यें पुरें झालें व लगेच ते ॲम्हर्स्ट कॉलेजमध्यें उपग्रंथपाल म्हणून काम करूं लागले. ते कॉलेजमध्यें असतांनाच इ. स. १८७३ मध्यें त्यांनीं आपल्या दशांश वर्गीकरण पद्धतीचा आराखडा तयार केला. ह्या पद्धतींत अंकनाकरितां केवळ अरबी अंकांचा दशांश अपूर्णांक रूपानें उपयोग केला असल्यामुळें व तिच्या वर्गीकृत तक्त्याची सूचि विषयांचे अन्योन्य संबंध विशद रीतीनें दाखविणारी व वरीच विस्तृत असल्यामुळें वर्गीकरण करणागला तिचा उपयोग करून बहुतेक विषयांना अगदीं अल्प वेळांत योग्य वर्गांक देणें शक्य होतें. ह्या कारणामुळें ग्रंथपालांना ही पद्धति इतर सर्व वर्गीकरण-पद्धतींपेक्षां विशेष सोपी वाटते आणि म्हणूनच जगांतील बहुसंख्य ग्रंथालयांनीं तिचा स्वीकार केला आहे.

डॉ. ड्यूए यांनीं आपल्या वर्गीकरणपद्धतींत दशांश अपूर्णांक अंकन प्रणालीचा स्वीकार केल्यामुळें अंकनाच्या प्रकारांत ( Mode of Notation ) पहिली निश्चित सुधारणा झाली. त्यामुळें नवीन विषयांना जेव्हां व जेथें स्थान द्यावें लागतें तें देतां येणें शक्य झालें आहे. ह्या सोयीमुळें गौण विषयांना (Subordinate subjects) सोयीचें स्थान ( helpful place ) देणें सहज शक्य झालें आहे ही रचना इतकी सुसंबद्ध होते कीं, कमी कमी विस्ताराच्या ( decreasing extension ) एका मागोमाग येणाऱ्या गौण विषयांची सांखळीच ( chain of modulated sub-classes ) निर्माण होते. ह्या प्रकाराला डॉ. रंगनाथन् यांनीं ध्वंसन क्रिया ( Denudation ) म्हणजे विस्ताराचें ध्वंसन अथवा सच्चीकरण अशी संज्ञा दिली आहे.

परिगणनात्मक ( enumerative ) वर्गीकरणपद्धतींतील दोष

नवीन समपङ्क्ति वर्गांना अथवा समसमान वर्गांना (coordinate classes), विविध मुखांच्या वर्गांना ( multi faceted classes), विविध अवस्थायुक्त वर्गांना ( multi phased classes ) व अगदींच नवीन मुख्य वर्गांना योग्य स्थान प्राप्त करून कसें द्यावयाचें ही मुख्य अडचण कित्येक वर्षे भासत होती. ही अडचण प्रचारांत असलेल्या कोणत्याहि सर्वमान्य वर्गीकरण पद्धतीला

समाधानकारकरीतीनें सोडवितां येणें शक्य नाहीं. ह्या पद्धति साधारणपणें परिगणनात्मक (enumerative) म्हणजे गतकालांतील व चालूं काळांतील विषयांना तयार वर्गांक पुरविणाऱ्या पद्धति असल्यामुळें भावी काळांत जे नवीन विषय निर्माण होणार त्यांचा समावेश तयार वर्गांकांचे कोष्टकांत करतां येत नसे म्हणूनच त्या पद्धतींत ज्या कांहीं सुधारणा करण्यांत आल्या आहेत त्या समाधानकारक होऊं शकल्या नाहींत; कारण त्यांना कांहीं ठराविक नियमांचें अथवा कांहीं विशिष्ट पद्धतींचें पाठबळ नाहीं.

## द्विबिन्दु पद्धतीचीं कांहीं वैशिष्ट्ये

याकरितां ज्या वर्गीकरणपद्धतीप्रमाणें भविष्यकाळीं निर्माण होणाऱ्या विषयांना योग्य वर्गांक देणें शक्य आहे अशी नवीन वर्गीकरणपद्धति निर्माण करणें अत्यंत आवश्यक होतें; आणि ह्याच उद्देशानें डॉ. रंगनाथन् यानीं इ. स. १९२५ मध्यें आपल्या द्विबिन्दुवर्गीकरण पद्धतीची अत्यंत परिश्रमपूर्वक रचना केली. त्यांनीं तिची मांडणी अशी केली आहे कीं, एखादा विषय अत्यंत सूक्ष्म असला तरी त्याला पूर्ण अर्थवाही वर्गांक तयार करणें शक्य व्हावें. त्यांच्या वर्गांक तयार करण्याच्या पद्धतीला त्यानीं लहान मुलांच्या खेळण्यांतील ठराविक सांच्याच्या ठोकळेवजा उपकरणांच्या संचाची ( Meccano Apparatus ) उपमा दिलेली आहे. ज्याप्रमाणें संचातील ठोकळ्यांच्या साहाय्यानें लहान मुलांना हव्या त्या निरनिराळ्या आकृति तयार करतां येतात; त्याचप्रमाणें डॉ. रंगनाथन् यांच्या पद्धतींतील निरनिराळ्या कोष्टकांच्या ( Schedules ) व स्मरणसुलभ युक्त्यांच्या ( Mnemonic devices) साहाय्यानें निरनिराळ्या विशिष्ट विषयांना विशिष्ट वर्गांक ( Specific class numbers to specific subjects ) तयार करतां येतात. ह्या पद्धतींत द्विबिन्दु ( : ) ह्या चिन्हाचा उपयोग ठोकळ्यांच्या उपकरणांतील चाव्या आणि खिळे ( Nuts and bolts ) ह्याप्रमाणें केला जातो.

निरनिराळ्या वर्गोपवर्गांत वर्गीकरणाकरितां ह्या पद्धतींत ठराविक मुखपरिसूत्रें ( Facet Formulae ) दिलीं आहेत व त्या परिसूत्रांतील संबंधित मुखांचे ( Facets ) विभाग दाखविणारीं मूलघटक संज्ञांचीं कोष्टकें

(schedules of fundamental constituent terms) त्या त्या परिसूत्राखालीं दिलेलीं आहेत. ह्या कोष्टकांच्या साहाय्यानें व ग्रंथकारानें ठरवून दिलेल्या नियमांप्रमाणें निरनिराळ्या ग्रंथांना त्यांच्या विशिष्ट विषयांप्रमाणें वर्गांक तयार करावे लागतात. ह्यावरून आपलें असें लक्षांत येईल कीं ह्या पद्धतींत प्रथम निरनिराळ्या ठराविक मुखांच्या मूलघटक संज्ञांच्या साहाय्यानें संबंधित विषयाचें विभाजन (analysis) करण्यांत येतें व नंतर त्या विषयाचा वर्गांक तयार करतांना कोष्टकांतील संबंधित विभागांच्या संज्ञा एकत्र जुळविण्यांत (synthesize) येतात. अशा ह्या पद्धतीच्या विशिष्ट रचनेमुळें व तींमध्यें वर्गांक तयार करण्याकरितां एक विशिष्ट पद्धति अनुसरावी लागत असल्यामुळें तिला विभाजन-संयोजनक्षम वर्गीकरण पद्धति (analytico-synthetic scheme of classification) असें नांव देण्यांत येतें.

पृथक्करण क्रिया (The act of Dissection)

एका मुखांतील निकटवर्ति विश्वांतून एकाच विभाजन गुणाचे साहाय्यानें एकमेकांपासून भिन्न व समसमान असे जे विभाग तयार करण्यांत येतात त्या क्रियेला पृथक्करण क्रिया (the act of dissection) अशी संज्ञा डॉ. रंगनाथन् यांनीं दिलेली आहे. अशा पृथक्कृत वर्गांना समसमान वर्ग (coordinate classes) ही संज्ञा आहे व त्यांचे पङ्क्तिला वर्गांची पङ्क्ति (an array of classes) अशी संज्ञा आहे. डॉ. रंगनाथन् यांनीं निरनिराळ्या मुखांचीं ठराविक मूलघटक संज्ञांचीं जीं कोष्टकें तयार केलेलीं आहेत त्यांतील समसमान वर्गांची मांडणी पृथक्करण पद्धतीनें (the method of dissection) केलेली आहे.

ध्वंसनक्रिया (The act of Denudation)

एका मुखांतील निकटवर्ति विश्वांतून निरनिराळ्या विभाजन गुणांचे साहाय्यानें कमी कमी विस्ताराच्या एका मागोमाग येणाऱ्या गौण विषयांची जी सांखळी निर्माण करण्यांत येते त्या क्रियेला ध्वंसन क्रिया (the act of denudation) असें डॉ. रंगनाथन् यांनीं म्हटलें आहे. ह्याबद्दल डॉ. ड्यूए यांच्या दशांश अंकन प्रणालीच्या संदर्भानें वर थोडेंसें निवेदन केलेंच आहे. डॉ. रंगनाथन् यांनीं ही सांखळी निर्माण करण्याविषयींचे नियम तयार केलेले

आहेत व त्या नियमांचे अनुरोधानें त्यांच्या पद्धतींतील गौण विषयांच्या सांख्व्या तयार करण्यांत आल्या आहेत.

स्तरण क्रिया ( The act of Lamination )

डॉ. रंगनाथन् यांच्या पद्धतीचें तिसरें वैशिष्ट्य असें आहे कीं निरनिराळ्या विभाजन गुणसमुच्चयांच्या ( Trains of Characteristics ) साहाय्यानें जीं निरनिराळीं मुखें तयार होतात त्यांचे त्यांनीं पांच प्रकार ठरविले आहेत व त्या प्रकारांना ( १ ) व्यक्तित्व मुख ( Personality Facet ), ( २ ) वस्तु अथवा साधनमुख ( Matter or Material Facet ), ( ३ ) ऊर्जामुख ( Energy Facet ), ( ४ ) स्थल मुख ( Space Facet ) आणि ( ५ ) कालमुख ( Time Facet ) अशीं नांवें दिलीं आहेत. हीं मुखें निरनिराळीं दाखविण्याकरितां त्यांचीं संयोगचिन्हेंसुद्धां त्यांनीं ठरविलीं आहेत. ह्या मुखांपैकीं व्यक्तित्व मुखापुढें जें ऊर्जामुख अथवा वादविषय ( Problem ) मुख येतें त्यांतील कांहीं विभागांचा मागील व्यक्तित्व मुखाशीं सर्वसाधारणपणें संबंध येतो व शिवाय व्यक्तित्वमुखांतील विशिष्ट विभागाशींसुद्धां संबंध येतो. उदाहरणार्थ " प्राण्यांचे रोग " हा विषय आपण घेतला तर प्राणिशास्त्रांत त्याचा संबंध दोन प्रकारांनीं आपणांस दाखवितां येतो. पहिला संबंध सर्वसाधारण प्राणिजात यांचे रोग असा असतो व दुसरा संबंध विशिष्ट प्राण्यांचे रोग असा असतो. अशा विषयांतील 'रोग' हा विषय परस्परव्यापी ( overlapping ) आहे असें आपणांस दिसतें. हे संबंध डॉ. रंगनायन् यांच्या मुख–पृथकरण ( Facet analysis ) ह्या योजनेमुळेंच नीट दाखवितां येतात. असे संबंध दाखविण्याच्या क्रियेला डॉ. रंगनायन् यांनीं स्तरण–क्रिया ( the act of Lamination ) ही संज्ञा दिलेली आहे.

विरल विषय संघात ( An assemblage of loose subjects ).

कित्येक वेळीं दोन भिन्न विषयांचा संबंध दाखविणारे विशिष्ट विषय निर्माण होतात. जसें– स्थापत्यशास्त्रज्ञांकरितां गणित ( Mathematics for Engineers ) अथवा शिक्षणाचा संख्यास्थितिद्योतक अभ्यास ( Statistical Study of Education ) अशा विषयांना " विरळ विषयसंघात " ( An assemblage of loose subjects ) ही संज्ञा डॉ.

रंगनाथन् यांनीं दिली आहे; व त्यांनीं अशा संबंधित विरळ विषयांचे वर्गांक तयार करण्याकरितां स्वतंत्र योजना व नियम ठरविलेले आहेत.

ह्या पद्धतीच्या अशा अनेक वैशिष्ट्यांमुळें तिचें एकंदर स्वरूप इतर विद्यमान परिगणनात्मक सर्वमान्य वर्गीकरण पद्धतींच्या स्वरूपांपासून भिन्न आहे असें आपणांस सहज आढळून येतें.

ही पद्धति उत्क्रटत्वानें विकासशील व सूक्ष्मत्वशील आहे. तीमध्यें विषयांची संबंधानुसारी मांडणी करण्याचें तत्त्व अगदीं काटेकोरपणानें पाळलें जात असल्यामुळें ती साहजिकच आंतरराष्ट्रीय मान्यतेस पात्र झाली आहे. सर्वसाधारण वर्गीकरणाचीं विशिष्ट तत्त्वें व ग्रंथांच्या वर्गीकरणाचीं विशिष्ट तत्त्वें–अशी वर्गीकरण शास्त्राच्या तत्त्वांची फोड करून आणि त्या तत्त्वांच्या व्याख्या ठरवून, त्या व्याख्यांचे अनुरोधानें ह्या वर्गीकरणाची मांडणी डॉ. रंगनाथन् यांनीं केलेली आहे.

ह्या पद्धतींत अधिकाधिक सुधारणा करण्याचें कार्य ग्रंथकारानें मोठ्या चिकाटीनें चालू ठेवलेलें आहे. ह्या पद्धतीप्रमाणें भारतांतील कित्येक विद्यापीठांचीं ग्रंथालयें, संशोधन संस्थांचीं ग्रंथालयें, शालेय ग्रंथालयें, व्यवसाय ग्रंथालयें व वृत्तपत्र ग्रंथालयें–अशा अनेक ग्रंथालयांतील ग्रंथांचें वर्गीकरण केलें जात आहे. इंग्लंड, अमेरिका व इतर पाश्चिमात्य राष्ट्रांतून ही पद्धत चांगली नांवाजली जात आहे. ही पद्धत शिकण्याकरितां अमेरिकेंत अभ्यासमंडळें स्थापन झालीं आहेत. ह्या पद्धतीची माहिती डॉ. रंगनाथन् यांचे मुखांतून ऐकण्यास मिळावी म्हणून युरोपियन राष्ट्रांतील निरनिराळ्या संस्था डॉ. रंगनाथन् यांना इ. स. १९४८ पासून आतांपर्यंत युरोप व अमेरिका येथें बोलावीत आहेत व त्यांचीं स्वतंत्र व्याख्यानें करवीत आहेत; तसेंच त्यांच्याशीं ह्या विषयावर विचारविनिमय करण्यांत येत आहे.

## द्विबिंदु पद्धतींतील रोमी चिह्नांचें नागरीवर्णमालेंत रूपांतर

मराठी-ग्रंथ-सूचिकर्ते श्री. शंकर गणेश दाते हे आपली सूचि तयार करीत असतांना त्यांनीं ह्या पद्धतीचा अभ्यास चालू ठेवला होता; व ह्या पद्धतीची इ. स. १९३९ मध्यें जेव्हां दुसरी आवृत्ति निघाली तेव्हां ह्या पद्धतींत अंकनाकरितां रोमी वर्ण उपयोजिले असल्यामुळें त्यांना त्यांची सूचि तयार

करण्याचे कामीं नाइलाजानें ह्या पद्धतीचा स्वीकार करतां आला नाहीं. परंतु ह्या पद्धतींतील रोमी अंकनाचें नागरी वर्णमालेंत रूपांतर होणें फार आवश्यक आहे असें त्यांना वाटल्यावरून त्यांनीं इ. स. १९४६ पर्यंत ह्या बाबतींत बराच विचार करून त्या वर्षी द्विबिंदु पद्धतींतील रोमी वर्णांच्या अंकना-ऐवजीं नागरी वर्णांची योजना निश्चित केली; व त्या बाबतींत डॉ. रंगनाथन् यांचेबरोबर पत्रव्यवहार करून स्वतःला नागरी वर्णांची योजना ज्याप्रमाणें पटली त्याप्रमाणें ती आखून त्या योजनेचें "द्विबिन्दु वर्गीकरण पद्धतींतील रोमी व आरबी वर्णांक चिन्हांचे जागीं बालबोध चिन्हांची योजना" ह्या नांवाचें एक उपयुक्त पुस्तक प्रसिद्ध केलें.

श्री. दाते यांनीं ह्या पुस्तकांत मुख्य वर्गांचा जो तक्ता प्रसिद्ध केला आहे तो डॉ. रंगनाथन् यांनीं लेख रूपानें "इंडियन लायब्रेरियन" ह्या नांवाच्या त्रैमासिकाच्या जून १९४७ च्या अंकांत प्रकाशित केला होता. त्या लेखांत डॉ. रंगनाथन् यांनीं असें प्रतिपादिलें होतें कीं, जरी भारतांतील निरनिराळ्या भाषांचे वर्ण भिन्न असले तरी सर्व भारतीय भाषांकरितां एकच वर्णांचा तक्ता असावा. तो लेख प्रसिद्ध झाल्यावर कांहीं सूचना त्यांचेकडे आल्या. ह्या सूचनांचा विचार करून व ग्रंथालय-परिसापातील सहकाऱ्यांशीं त्या बाबतींत बराच सखोल विचारविनिमय करून त्यांनीं नागरी वर्णमालेचा रूपांतरित तक्ता कायम केला.

ह्या पुस्तकांत डॉ. रंगनाथन् यांनीं तयार केलेल्या नागरी वर्णमालेच्या रूपांतरित तक्त्याच्या अनुरोधानें मुख्य वर्गांचा तक्ता दिला आहे.

### कोलन शब्दाचा अर्थ

'Colon classification' ह्या इंग्रजी पारिभाषिक शब्दांतील 'Colon' ह्या शब्दाला मराठींत प्रतिशब्द म्हणून 'द्विबिन्दु' हा शब्द योजावा कीं 'विसर्ग' हा शब्द योजावा ह्याबद्दल मध्यंतरी थोडा वाद निर्माण झाला होता. त्याबद्दल थोडें निवेदन पुढें दिलें आहे.

'Colon' ह्या शब्दाचा 'बिन्दुयुग्मम्' असा अर्थ कै. प्रा. वामन शिवराम आपटे यांच्या "English-Sanskrit" कोशांत दिला आहे; तसेंच कै. श्री. नीलकंठ बाबाजी रानडे यांच्या "Twentieth Century

English Marathi" कोशांत विराम चिन्ह ( : ) अथवा द्विबिन्दु चिन्ह असा दिला आहे.

'ग्रंथालयशास्त्राचा ओनामा' हें पुस्तक इ. स. १९३३ मध्यें प्रसिद्ध झालें. त्या पुस्तकांत ह्या पद्धतीची माहिती देतांना त्या पुस्तकाच्या ग्रंथकारानें ह्या पद्धतीला 'द्विबिन्दुवर्गीकरण पद्धति' असें नांव दिलें व तें पुढें तसेंच रूढ झालें. परंतु इ. स. १९४९ मध्यें महामहोपाध्याय मा. दत्तो वामन पोतदार यांनीं ह्या पद्धतीला 'द्विबिन्दु पद्धति' न म्हणतां 'विसर्ग पद्धति' म्हणावें असें सुचविलें; व त्यानंतर ह्या पद्धतीच्या मराठी नांवाबद्दल थोडी चर्चा झाली.

Colon scheme (कोलन स्कीम) ह्या इंग्रजी परिभाषेला मराठींत 'द्विबिन्दु पद्धति' ह्या परिभाषेऐवजीं 'विसर्ग पद्धति' ही परिभाषा वापरावी ही मा. पोतदार यांची सूचना मान्य करण्यास एक अडचण निर्माण होत आहे. विसर्ग हा आपल्या नागरी वर्णमालेंतला सोळावा स्वर आहे व त्याचें ( : ) असें चिह्न आहे. शिवाय विसर्ग ह्याअर्थीं हें चिन्ह वापरलें तर त्याला एक विशेष अर्थ निर्माण होतो. कारण संस्कृत भाषेंत हा स्वर हकार या अर्थानें वापरतात. उदाहरणार्थ रामः, रावणः, तसेंच प्रत्ययाच्या अंतीं असणाऱ्या स् व र् ह्या व्यंजनाबद्दलहि ( : ) विसर्गाचा उपयोग करतात.

कोलन वर्गीकरण पद्धतीचे ग्रंथकार डॉ. रंगनाथन् यांनीं त्यांच्या "Classified catalogue code, 3rd edn. 1951" ह्या पुस्तकाच्या शेवटीं "Glossary of Terms" ह्या पारिभाषिक कोशांत Colon classification ह्या इंग्रजी परिभाषेला 'द्विबिन्दु वर्गीकरण' ही परिभाषा वापरली आहे. डॉक्टर रंगनाथन् स्वतः संस्कृत भाषेचे गाढ व्यासंगी आहेत व त्यांचे संस्कृतोद्भव ग्रंथालय-परिभाषा ठरविण्याचे प्रयत्न चालू आहेत; व ह्या विषयावर त्यांनीं भारतीय ग्रंथालयसमितीच्या *ANNALS* ह्या नियतकालिकाच्या पहिल्या भागांत (१९४९-५०) पांच लेख प्रसिद्ध केले आहेत. ह्यावरून कोलनवर्गीकरण पद्धतीच्या ग्रंथकारानेंसुद्धां 'Colon' ह्या इंग्रजी परिभाषेला 'द्विबिन्दु' ही परिभाषा योजल्यामुळें तीच पुढें रूढ होणें उचित आहे.

### द्विबिन्दु पद्धतीच्या आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या आवृत्ति

ह्या पद्धतीची इ. स. १९३३ मध्ये पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर तिच्यावर अनेक लेख प्रसिद्ध झाले व निरनिराळ्या ग्रंथालयपरिषदातून बऱ्याच चर्चा झाल्या. डॉ. रंगनाथन् यांचे ह्या पद्धतींत सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्न अजूनहि चालूं आहेत. इ. स. १९३८ मध्यें तिची सुधारलेली दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाली; व इ. स. १९५० मध्यें आणखी कांहीं सुधारणा करून तिची तिसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्यांत आली. तिसऱ्या आवृत्तींत सुद्धां अनेक सुधारणा करून इ. स. १९५२ मध्यें ह्या पद्धतीची चौथी आवृत्ति प्रसिद्ध झाली. इ स. १९५२ नंतर इ. स. १९५६ पर्यंत डॉ. रंगनाथन् यांनीं ह्या पद्धतींत आणखीहि विशेष उल्लेखनीय सुधारणा केल्या व तिची सुधारलेली पांचवी आवृत्ति छापण्याचें काम सध्यां चालूं आहे.

### ब्लिस यांची वाङ्मयरचना वर्गीकरणपद्धति ( Bibliographic Classification )

अमेरिकेंतील नामवंत ग्रंथपाल हेन्री एव्हेलिन ब्लिस यांची वाङ्मयरचना वर्गीकरणपद्धति ही अर्वाचीन प्रमुख वर्गीकरणपद्धतींपैकीं एक महत्त्वाची पद्धति आहे. तिची प्राथमिक मांडणी त्यांनीं इ. स. १९०२ मध्यें केली. ह्या पद्धतीचें एक विशेष असें आहे कीं ज्ञानाच्या एकमेकांशीं संबंध असलेल्या क्षेत्रांची व त्यांच्या शाखांची मांडणी त्यांच्या परस्पर संबंधानुसारी करण्यांत आली आहे.

ब्लिस यांचा जन्म न्यूयॉर्कमध्यें दि. २९ जानेवारी १८७० रोजीं झाला. त्यांचा शिक्षणक्रम पूर्ण झाल्यावर इ. स. १८९१ मध्यें न्यूयॉर्क येथील महाविद्यालयाचे ग्रंथालयांत ग्रंथपाल म्हणून त्यांची नेमणूक झाली. तेथील ग्रंथांचें वर्गीकरण करतांना त्यांना त्यावेळीं अमेरिकेंत ज्या वर्गीकरण-पद्धति प्रचारांत होत्या त्यांत बरेच दोष आढळून आले. म्हणून त्यांनीं इ. स. १९०२ मध्यें आपल्या स्वतःच्या वर्गीकरणपद्धतीचा आराखडा तयार केला व त्या पद्धतीप्रमाणें आपल्या ग्रंथालयांतील ग्रंथांचें वर्गीकरण करण्यास सुरवात केली. तेव्हांपासून त्यांनीं वर्गीकरणशास्त्राचा सखोल अभ्यास करून त्यांना अमेरिकेंत प्रचारांत असलेल्या वर्गीकरणपद्धतींत जे दोष दिसत होते

त्यांवर ग्रंथालयव्यवसायावरील नियतकालिकांतून लेखरूपानें चर्चा केली. त्यानीं ज्ञानाचें वर्गीकरण व ग्रंथांचें वर्गीकरण यांचा तौलनिक अभ्यास करून दोन मौलिक ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्यांचीं नांवें —(1) Organisation of Knowledge and the System of the Sciences and (2) Organisation of Knowledge in Libraries. ब्लिस यांची वर्गीकरणपद्धति आतांपर्यंत परिगणनात्मक अशा ज्या वर्गीकरणपद्धति निर्माण झाल्या त्या सर्वांपेक्षां श्रेष्ठ दर्जाची आहे. परंतु डॉ. रंगनाथन् यांच्या पद्धतींत (१) मुखपरिसूत्रें (Facet Formulae), (२) मूलघटक संज्ञांचीं कोष्टकें (Schedules of Fundamental Constituent Terms), (३) समपद्धति वर्गांकरितां पङ्क्तींचीं योजना (The Device of Arrays for Coordinate Classes), (४) गौण वर्गांकरितां सांखळ्यांची योजना (The Device of Chains for Subordinate Classes), (५) विविध प्रकारच्या कांहीं विशिष्ट विषयांकरितां स्मरणसुलभ युक्त्यांची योजना (Mnemonic Devices) अशीं कांहीं वैशिष्टयें असल्यामुळें त्या पद्धतीप्रमाणें सूक्ष्मातिसूक्ष्म अशा विषयाला पूर्ण अर्थवाही वर्गांक तयार करणें जसें शक्य आहे तसें ब्लिस यांचें वर्गीकरण पद्धतींत शक्य नाहीं; व तसें पूर्ण अर्थवाही वर्गांक सर्व विषयांना देण्याची आवश्यकता नाहीं असें ब्लिस यांचें म्हणणें आहे म्हणून त्यानीं त्या दृष्टीनें आपल्या पद्धतीची मांडणी केलेली नाहीं. त्यांच्या पद्धतीचें एक वैशिष्टय असें आहे कीं, त्यानीं ज्ञानाच्या ज्या शाखोपशाखांचा समावेश आपल्या पद्धतींत केला आहे त्यांची संगति अगदीं उत्कृष्ट रीतीनें साधण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. ह्यामुळें कांहीं नवीनच निर्माण झालेल्या विषयांचें योग्य स्थान ज्ञानाच्या कोणत्या शाखेंत आहे हें आपणांस ब्लिस यांच्या पद्धतीमध्यें सहज समजूं शकतें. ब्लिस यांनीं आपल्या पद्धतींत ४५ सामान्य व विशिष्ट कोष्टकें दिलेलीं असल्यामुळें, मूळ ग्रंथांत कांहीं विषयांचा समावेश जरी केलेला नसला तरी त्यांना त्या कोष्टकांचे साहाय्यानें युक्त वर्गांक देतां येतात. ब्लिस यांची पद्धति कितीहि चांगली असली तरी तीमध्यें आपल्या भारतीय विद्यांचा नीट समावेश केलेला नसल्यामुळें ती आपल्या ग्रंथालयांतील ग्रंथांचें वर्गीकरण करण्यास डॉ. रंगनाथन् यांच्या पद्धतीइतकी पूर्णत्वानें उपयोगाची नाहीं.

## मुख्य वर्गाची संख्या

अर्वाचीन वर्गीकरणपद्धतींच्या काही वैशिष्ट्यांपैकी त्यांच्या मुख्य वर्गाची संख्या हें एक वैशिष्टच आहे ड्यूए याच्या दशांश पद्धतीच्या मुख्य वर्गाची संख्या ९ आहे, कारण त्यानीं मुख्य वर्गाकरिता १ ते ९ अशा अरबी अंकाची योजना केली आहे. परंतु कटर, ब्राऊन, रंगनाथन्, ब्लिस याच्या पद्धति व लायब्ररी ऑफ कॉंग्रेस ही वर्गीकरणपद्धति या सर्व पद्धतींत मुख्य वर्गाकरिता रोमी अक्षराचा उपयोग केलेला असल्यामुळें त्यांच्या मुख्य वर्गाची संख्या विस्तृत झालेली आहे. डॉ रंगनाथन् यानीं रोमी वर्णमालेचे सर्व वर्ण वापरून शिवाय काहीं ग्रीक वर्ण सुद्धा मुख्य वर्गाकरिता वापरले असल्यामुळें त्याच्या पद्धतीच्या मुख्य वर्गाची संख्या इतर पद्धतींतील मुख्य वर्गाच्या संख्येपेक्षा जास्त विस्तृत झालेली आहे.

## सूक्ष्म वर्गीकरण

अलीकडे ग्रंथालयांतील वर्गीकरणाचा प्रश्न ग्रंथांच्या वर्गीकरणापुरताच मर्यादित राहिलेला नसून त्याचा व्याप नियतकालिकांतील व संकलित ग्रंथांतील विशिष्ट लेखाचें वर्गीकरण आणि सूक्ष्मात् सूक्ष्म अशा अनेक नवीन नवीन विषयाचें वर्गीकरण करणें असा व्यापक स्वरूपाचा झालेला आहे. असें सूक्ष्म वर्गीकरण ( Depth classification ) करून वर्गीकृत सूचि तयार केली तर तिचा उपयोग संशोधकाना फार होतो.

## विस्तृत दशांश वर्गीकरण पद्धति
## ( Expanded Decimal classification Scheme )

याकरिता असें सूक्ष्म वर्गीकरण करण्यास एखादी सर्वमान्य वर्गीकरण-पद्धति असावी ही कल्पना काहीं पाश्चिमात्य संशोधकाना व ग्रंथपालाना सुचल्यावरून त्यानीं इसवी सन १८९५ मध्यें ब्रुसेल्स ह्या शहरीं इंटर-नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ बिब्लिओग्राफी (आता इंटरनॅशनल फेडरेशन ऑफ डॉक्युमेंटेशन ) ह्या संस्थेची स्थापना केली व त्यानीं ड्यूए याच्या दशांशपद्धतींत निरनिराळ्या संज्ञा योजून भरपूर वाढ करण्याचें काम हातीं घेतलें. हें काम पुढें बरेच प्रगत होऊन त्या विस्तृत दशांशवर्गीकरण

पद्धतीची ( Expanded Decimal Classification Scheme ) पहिली आवृत्ति इ. स. १९०५ मध्यें प्रसिद्ध झाली; व तिचें नांव सर्वसामान्य दशांश-वर्गीकरण-पद्धति ( Universal Decimal Classification Scheme ) असें ठेवण्यांत आलें. ह्या पद्धतींत तेव्हांपासून सारखी सुधारणा करण्यांत येत आहे. हा सर्व विस्तार ड्यूए यांच्या पद्धतीचा पाया आहे तसाच ठेवून केलेला असल्यामुळें त्यांत बरेच दोष आढळतात व या पद्धतीचे वर्गांक रंगनाथन् यांच्या पद्धतीच्या वर्गांकाप्रमाणें शास्त्रोक्त रीतीनें तयार केलेले नसतात आणि ते कित्येक वेळीं संपूर्ण अर्थवाहीसुद्धां नसतात असें डॉ रंगनाथन् यांनीं अनेक लेखांत सिद्ध करून दिलें आहे.

ह्या प्रकरणांत ग्रंथांच्या वर्गीकरणाचे बाबतींत आतांपर्यंत सुधारणा घडवून आणण्याचे जे प्रयत्न झाले त्यांची स्थूल मानानें माहिती दिली आहे व द्विबिंदु वर्गीकरण पद्धतीचीं कांहीं वैशिष्ट्यें विशद करून दाखविलीं आहेत. पुढील प्रकरणांतून द्विबिंदु ह्या वर्गीकरण पद्धतीची संपूर्ण माहिती शक्य तितक्या सोप्या भाषेंत देण्याचा प्रयत्न केला आहे.

---

## प्रकरण ३ रें

# मुख्य वर्ग ( Main Classes )

इ. स. १९५६ पर्यंत डॉ. रंगनाथन् यांनीं आपल्या वर्गीकरण पद्धतींत ज्या अनेक सुधारणा केल्या आहेत त्यांपैकीं मुख्य वर्गांची वाढ ही एक महत्त्वाची सुधारणा होय. त्यांनीं आपल्या *Annals of Library Science* ह्या नियतकालिकाच्या भाग २ व ३ ( १९५५ व १९५६ ) मध्यें मुख्य वर्गांचीं चार मंडलें ( Four zones ) प्रतिपादिलीं आहेत. ह्या चार मंडलांच्या बोधचिन्हाचे त्यांनीं चार विभाग केले आहेत. हे चार विभाग चिन्हांच्या चार प्रकारांना उद्देशून केले आहेत; हें पुढील माहितीवरून वाचकांचे सहज लक्षांत येईल.

| मंडल | मुख्य वर्गांच्या प्रकाराचें नांव | बोधचिन्हें |
|---|---|---|
| पहिलें मंडल | ( १ ) संकीर्ण वाङ्मयप्रकार मुख्यवर्ग (Generalia Form Main Classes ) | (मूळ) रोमी लहानवर्ण (रूपांतरित) सानुस्वार नागरी वर्ण |
| | ( २ ) संकीर्ण मुख्यवर्ग (Generalia Main classes ) | |
| दुसरें मंडल | अर्वाचीन काळांत मान्यता पावलेले ( Recently recognised main Classes ) व युक्त मुख्य वर्गांत ज्यांचा समावेश करतां येत नाहीं असे मुख्य वर्ग | ( मूळ ) अरबी अंक ( रूपांतरित ) भारतीय अंक |
| तिसरें मंडल | ( १ ) नवीनच निर्माण होणाऱ्या ज्ञान शाखा ( Newly emerging disciplines ) | उपान्त्य अष्टक अंक ( Penultimate octave digits ) |
| | ( २ ) युक्त मुख्य वर्ग ( Proper Main Classes ) | ( मूळ ) रोमी मोठे वर्ण (रूपांतरित) नागरी वर्ण |

| मंडल | मुख्य वर्गांच्या प्रकाराचें नांव | बोधचिन्हें |
|---|---|---|
| चौथें मंडल | नवीन निर्माण होणाऱ्या विधिविद्या (Newly emerging methodologies) | वेष्टिताचिन्हें (Packeted Notation) |

वर निर्देश केलेल्या सुधारणांप्रमाणें चारी मडलांच्या मुख्य वर्गांची सविस्तर माहिती पुढें दिली आहे.

पहिलें मंडल ( First Zone )

पहिल्या मंडलांतील मुख्य वर्गांचे दोन गट केले आहेत.

पहिल्या गटांतील मुख्य वर्ग पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

### (१) संकीर्ण वाङ्मयप्रकार मुख्य वर्ग (Generalia Form Main Classes)

| सानुसार नागरी वर्ण | मुख्य वर्गाचें नांव | रोमी लहान वर्ण |
|---|---|---|
| इं | संकीर्ण वाङ्मय सूची; संकीर्ण ग्रंथ सूची (General bibliographies) | *a* |
| टं | संकीर्ण ज्ञानकोश (General encyclopaedias) | *k* |
| ढं | संकीर्ण कालिकें; नियतकालिकें (General periodicals) | *m* |
| थं | संकीर्ण वार्षिकें; जंत्र्या; दिनदर्शिका (General year-books; directories; calendars; almanacs) | *n* |
| वं | संकीर्ण चरित्रें (General biographies) | *w* |
| शं | संकीर्ण ग्रंथ (General collections) | *x* |

वर जे संकीर्ण मुख्य वर्ग दिले आहेत ते ह्या वर्गीकरणपद्धतींत जे मुख्य वर्ग व त्यांचे उपविभाग असतील त्या सर्वांचे कारणपरत्वें अग्रवर्ती सामान्य उपविभाग ( Anterior Common subdivisions ) म्हणून उपयोगांत आणण्यांत येतात. अशा प्रकारच्या सामान्य उपविभागांना जीं चिन्हें वापरलीं आहेत तींच चिन्हें ह्या संकीर्ण वाङ्मयप्रकार मुख्य वर्गांना वापरलीं आहेत. त्यामुळें तीं स्मरणसुलभ ( Mnemonic ) झालीं आहेत.

उदाहरणार्थ—

| | | |
|---|---|---|
| इं | संकीर्ण ग्रंथसूचि | *a* |
| गइं | रसायनशास्त्राची ग्रंथसूचि | E*a* |

वरील उदाहरणांपैकीं पहिलें उदाहरण संकीर्ण ग्रंथसूचीचें असल्यामुळें त्या वर्गाचा वर्गांक फक्त इं ह्या बोधचिन्हानें दाखविण्यांत येतो. दुसरें उदाहरण रसायनशास्त्राची ग्रंथसूचि असें आहे; म्हणून प्रथम रसायनशास्त्र ह्या मुख्य वर्गाचें ग हें बोधचिन्ह लिहून नंतर ग्रंथसूचिदर्शक इं हें बोधचिन्ह लिहिलें आहे.

अशा विभागांना अग्रवर्ती सामान्य उपविभाग असें नांव देण्याचें कारण ह्या विभागांत अंतर्भूत होणारे ग्रंथ संबंधित विषयावरील प्राथमिक स्वरूपाचे माहितीवजा ग्रंथ असतात. म्हणून त्यांची रचना संबंधित विषयावरील प्रबंधात्मक ग्रंथांचे ( Treatises ) आधीं करावी लागते. अशी रचना सहज करतां यावी म्हणून सानुस्वार नागरी वर्ण अथवा रोमी लहान वर्ण कोणत्याहि वर्गांकापुढें जोडला तर त्या वर्गांकाचें स्थानमूल्य मूळ वर्गांकाचें आधीं आहे असें ठरविण्यांत आलें आहे.

उदाहरणार्थ—

रसायनशास्त्रावरील प्रबंधात्मक ग्रंथ व रसायनशास्त्राची ग्रंथसूचि यांची रचना पुढीलप्रमाणें करण्यांत येते—

| नागरी वर्गांक | | रोमी वर्गांक |
|---|---|---|
| गइं | रसायनशास्त्राची ग्रंथसूचि | E*a* |
| ग | रसायन शास्त्रावरील प्रबंधात्मक ग्रंथ | E |

ह्या उपविभागांविषयी सविस्तर माहिती प्रकरण ७ (सामान्य उपविभाग-Common subdivisions) मध्यें दिलेली आहे.

## (२) संकीर्ण मुख्य वर्ग
## (Generalia Main Classes)

संकीर्ण वाङ्मयप्रकार मुख्य वर्गानंतर संकीर्ण मुख्य वर्गांची योजना केलेली आहे; व त्या वर्गाचें हं (z) हें बोधचिन्ह ठरविलें आहे. वास्तविक पाहता ज्याप्रमाणें कोणत्याहि मुख्य वर्गाचे अग्रवर्ती सामान्य उपविभाग त्या वर्गाच्या बोधचिन्हानंतर संबंधित बोधचिन्हें लिहून दाखविण्यांत येतात; हें वरील रसायनशास्त्राची ग्रंथसूचि ह्या उदाहरणावरून दिसून येतें. ह्याचप्रमाणें संकीर्ण वाङ्मयप्रकार मुख्य वर्ग हे सुद्धां संकीर्ण मुख्य वर्गाचे अग्रवर्ती सामान्य उपविभाग आहेत; म्हणून त्यांचीं बोधचिन्हें हं (z) ह्या संकीर्ण मुख्य वर्गदर्शक बोधचिन्हाचें नंतर लिहावयास पाहिजेत

जसें—हंइ संकीर्ण ग्रंथसूचि

परंतु संकीर्ण वाङ्मयप्रकार मुख्य वर्गांचीं चिन्हें वर्णमालेंतील स्थानमूल्याप्रमाणें हं ह्या चिन्हाचे मागचीं चिन्हें आहेत व ह्या चिन्हाचे पुढें जरी तीं चिन्हें लिहिलीं तरी त्या चिन्हांनीं दर्शविलेले मुख्य वर्ग हे संकीर्ण मुख्य वर्गावरील प्राथमिक स्वरूपाचे माहितीविजा वर्ग असल्यामुळें त्यांचें स्थान संकीर्ण मुख्य वर्गाचे मागें असावयास पाहिजे; व अग्रवर्ती सामान्य उपविभागांच्या बोधचिन्हांविषयीं जो नियम ग्रंथकारानें केलेला आहे त्याप्रमाणें हं ह्या चिन्हापुढें तीं चिन्हें लिहिलीं तरी त्यांचें स्थान आपोआप त्या चिन्हाचे मागे येवूं शकतें. परंतु असें न करतां जेव्हां संकीर्ण वाङ्मयप्रकार चिन्हांचा उपयोग करावा लागतो तेव्हां त्यांच्या मागें हं हें चिन्ह न लिहितां त्यांचा उपयोग करावा असा नियम ग्रंथकारानें केलेला आहे. तो नियम पुढें दिला आहे.—

Whenever the bare digit z (हं) (i. e not amplified by the alphabetical device or by geographical device) calls for anteriorising common subdivision, the digit z (हं) may be omitted and it is sufficient if the class

number begins with the anteriorising common sub-division digit.

पहिल्या मंडलाच्या दुसऱ्या गटांतील कांहीं मुख्य वर्ग पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

(२) हं संकीर्ण मुख्य वर्ग z
(Generalia Main Classes)

| | | |
|---|---|---|
| हं४ | पौर्वात्य विद्या (Orientalia) | z4 |
| हं४१ | चिनी विद्या (Sinology) | z41 |
| हं४४ | भारतीय विद्या (Indology) | z44 |
| हं५ | पाश्चिमात्य विद्या (Occidentalia) | z5 |
| हं७ | अमेरिकेची विद्या (Americana) | z7 |

वरील वर्ग हे ठराविक भूभागविभागांतील विद्या दाखविणारे आहेत. म्हणून हं ह्या संकीर्ण मुख्य वर्ग दर्शक चिन्हापुढें ज्या भूभाग विभागाची विद्या असेल त्या भूभाग विभागाचा बोधांक भूभागविभागांच्या कोष्टकाप्रमाणें *लिहिला आहे. भूभाग विभागांच्या कोष्टकाची सविस्तर माहिती प्रकरण ८ मध्यें* दिलेली आहे. असें वर्गांक तयार करण्याच्या युक्तीला (Device) भूभाग विभाग युक्ति (Geographical Device) असें त्या पद्धतीच्या ग्रंथकारानें ठरविलें आहे.

वर जे संकीर्ण मुख्य वर्गांचे विभाग दाखविले आहेत, त्यांचिप्रमाणें कारण-परत्वें *अनेक विभाग तयार करतां येतात. अशा विभागांची सध्या* विशेष आवश्यकता भासत आहे; कारण पौर्वात्य विद्या, पाश्चिमात्य विद्या, भारतीय विद्या, चिनी विद्या, वगैरे अशा प्रकारच्या संकीर्ण विषयांवर सध्यां नियतकालिक रूपानें, परिषदांचे रूपानें व ग्रंथरूपानें भरपूर वाङ्मय प्रसिद्ध होत आहे. अशा वाङ्मयाला ह्या पद्धतींतील युक्त मुख्य वर्गांत (Proper Main Classes) कोठेंच स्थान देतां येत नाहीं. म्हणून ग्रंथकारानें अशा वर्गांची पहिल्या मंडलांत संकीर्ण वाङ्मयप्रकारांचें वर्गानंतर मुद्दाम योजना केलेली आहे.

पहिल्या मंडलाच्या दुसऱ्या गटांत वर दाखविलेल्या विषयांचे विभागांनंतर

आणखी एका स्वतंत्र विभागाची योजना ग्रंथकारानें केली आहे. महात्मा गांधीसारख्या जगांतील कांहीं थोड्या महान् लेखकांनीं ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांवर आपले महत्त्वाचे विचार ग्रंथरूपानें व लेखरूपानें प्रकट केलेले असतात व अशा व्यक्तींचें समग्र वाङ्मय प्रकाशित करण्यांत येतें. अशा प्रकारच्या वाङ्मयाचा एक स्वतंत्र गट निर्माण करावा असें वाटल्यावरून ग्रंथकारानें ह्या पद्धतींत अशा वाङ्मयाला संकीर्ण मुख्य वर्गांत स्वतंत्र स्थान दिलें आहे. अशा वाङ्मयाचा वर्गांक तयार करावयाचा असेल तर हें ह्या संकीर्ण मुख्य वर्गदर्शक चिन्हांचे पुढें ज्या व्यक्तीचें वाङ्मय असेल त्या व्यक्तीच्या आडनांवाचें प्रथमाक्षर लिहावयाचें म्हणजे त्या व्यक्तीचें समग्र वाङ्मय असा अर्थ होतो. उदाहरणार्थ

हंगां महात्मा गांधींचे समग्र वाङ्मय ( Gandhiana ) zG

अशा वर्गांक तयार करण्याच्या युक्तीला वर्णानुक्रम युक्ति ( Alphabetical Device ) असें नांव ग्रंथकारानें दिलें आहे.

## दुसरें मंडल ( Second Zone )

ह्या मंडलांत अर्वाचीन काळांत मान्यता पावलेले व युक्त मुख्य वर्गांत ज्यांचा समावेश करतां येत नाहीं असे मुख्य वर्ग ( recently recognised main classes which cannot be accommodated in the proper main classes ) समाविष्ट केलेले आहेत. त्यांचें कोष्टक पुढें दिलें आहे.

### पहिलें अष्टक मुख्य वर्ग
### ( Main classes in the first octave )

| | | |
|---|---|---|
| १ | ज्ञानविश्व ( Universe of knowledge ) | 1 |
| २ | ग्रंथालयशास्त्र ( Library science ) | 2 |
| ३ | ग्रंथशास्त्र ( Book science ) | 3 |
| ४ | नियतकालिक प्रकाशन कला ( Periodical Publicationism ) | 4 |
| ४१ | क्रमिक कला ( Serialism ) | 41 |
| ४२ | नियतकालिक कला ( Periodicalism ) | 42 |

| | | |
|---|---|---|
| ४५ | पत्रकार कला ( Journalism ) | 45 |
| ७ | संपादन तंत्र ( Editing technique ) | 7 |
| ७२ | सूचि तंत्र ( Indexing technique ) | 72 |

वरील मुख्य वर्गाचें वैशिष्ट्य असें आहे कीं युक्त मुख्य वर्गातील वाङ्मय निर्माण करण्याकरिता ज्या विद्येचा उपयोग होतो अशा विद्येचा समावेश ह्या वर्गात केलेला आहे हें त्या वर्गाच्या नामावरून सहज लक्षात येतें ज्ञानाच्या शाखोपशाखांवर बहुविध वाङ्मय निर्माण करण्याकरिता वरील कोष्टकांतील विषयाचें ज्ञान प्रथम करून घेणें अत्यावश्यक आहे म्हणून द्वितीय मंडलाच्या प्रथम अष्टकात अशा वर्गाची मुद्दाम योजना केलेली आहे.

## दुसरें मंडल

### दुसरें अष्टक मुख्य वर्ग
### ( Main Classes in the Second Octave )

| | | |
|---|---|---|
| ९४ | युद्ध विद्या ( Science of War ) | 94 |
| ९४१ | सैनिकी विद्या, लष्करी विद्या, संग्राम विद्या ( Military Science ) | 941 |
| ९४५ | सामुद्रिक विद्या, जलयुद्ध विद्या ( Naval Science ) | 946 |
| ९४८ | आकाशयुद्ध विद्या ( Air Fight ) | 948 |

वर जे वर्ग दाखविले आहेत त्याचा समावेश ह्या पद्धतीच्या चौथ्या आवृत्तीपर्यंत उपयुक्त कला ( Useful Arts ) ह्या मुख्य वर्गात केलेला होता परंतु तें स्थान युद्धविद्येला योग्य नाहीं व दुसऱ्या कोणत्याच मुख्य वर्गात त्याचा नीट समावेश करता येत नाहीं असें ग्रंथकाराचे लक्षांत आल्या-मुळें त्यानें ह्या वर्गाला मुख्य वर्गातील द्वितीय मंडलाच्या दुसऱ्या अष्टकात स्वतंत्र स्थान दिलें आहे

## तिसरें मंडल ( Third Zone )

ह्या मंडलांतील मुख्य वर्गाचे दोन गट केले आहेत.

## पहिला गट

पहिल्या गटांत नवीनच निर्माण होत असलेल्या ज्ञानशाखांचा ( newly emerging disciplines ) समावेश करण्यांत आला आहे; व त्यांना मुख्य वर्गाच्या अगदीं जवळच मागील स्थान मिळावें म्हणून ह्या पद्धतींतील उपान्त्य अष्टक युक्तीचा ( Penultimate Octave Device ) उपयोग केला आहे. ह्या युक्तीप्रमाणें ९ ह्या अष्टक दर्शक अंकाचे ( Octavising digit ) उपविभाग विषय युक्तीचे ( Subject device ) साहाय्यानें अथवा कालक्रम युक्तीचे ( Chronological device ) साहाय्यानें करतां येतात. ह्या पद्धतींत ज्या निरनिराळ्या युक्तींचा उपयोग करण्यांत येतो; त्यांची विशद माहिती प्रकरण १३ स्मृतिसाधनें यांत दिली आहे. येथें ९ ह्या अंकांचे जे उपविभाग केले आहेत ते कालक्रम युक्तीचे साहाय्यानें केलें आहेत. हर्ली ह्या गटांत पुढील मुख्य वर्गांचा समावेश केलेला आहे.

| नागरी वर्गांक | | रोमी वर्गांक |
|---|---|---|
| ९थ१ | संकीर्ण शब्दार्थ विकास विज्ञान; शब्दविज्ञान ( Generalia Semantics ) | 9N1 |
| ९थ२ | तर्कशुद्ध वाक्यरचना विद्या ( Logical Syntax ) | 9N2 |
| ९थ३ | गणित तत्त्व विद्या ( Principia Mathematica ) | 9N3 |

वरील वर्गांविषयीं डॉ. रंगनाथन् यांनीं Depth Classification, Reference Service and Reference Material, 1953 ह्या पुस्तकांत पान १७६ वर पुढील विधान केलें आहे :—

" Certain new disciplines are emerging. Examples are: General Semantics, Logical Syntax and generally the region covered by Whitehead and Russell in their *Principia mathematica*. These too pervade all the traditional main classes. But they pervade them in the soul or thought sphere and not either in the subtle

body sphere as the prels or the physical body sphere as the classes already indicated in "M Useful Arts" The Canon of Helpful Sequence would indicate a place for them, prior to the traditional positive main classes," but later than the prels.

डॉ. रंगनाथन् यांच्या विधानावरून वरील वर्गांना तृतीय मंडलांत युक्त मुख्य वर्गाचें पूर्वीचें स्थान कां ठरविलें आहे हें सहज स्पष्ट होतें.

तृतीय मंडल (Third Zone)

दुसरा गट

ह्या गटांत पुढीलप्रमाणें युक्त मुख्य वर्गांचा समावेश केलेला आहे.

(i) विशिष्ट रचना

| | | |
|---|---|---|
| अ | ग्रंथालयाचा सर्वांत जास्त आवडता विषय (The most favoured subject of a library) | — |
| आ | ग्रंथालयाचा दुसरा आवडता विषय (The second favoured subject of a library) | |

वरील वर्ग निरनिराळ्या ग्रंथालयांच्या दृष्टीनें मुद्दाम निर्माण केलेले आहेत; व त्या त्या ग्रंथालयांत इतर वर्गांचे आधीं त्यांना स्थान मिळावें म्हणून त्यांचें ह्या कोष्टकांतसुद्धां पहिलें व दुसरें अशीं स्थानें ठरविलीं आहेत.

(ii) मुख्य रचना

| | | |
|---|---|---|
| इ | विज्ञान (Science) | A |
| उ | गणितशास्त्रें (Mathematical Sciences) | $\beta$ (Beta) |
| ऊ | गणित (Mathematics) | B |
| ए | वस्तुशास्त्रें (Physical Sciences) | Γ (Gama) |
| क | पदार्थविज्ञान; वास्तव (Physics) | C |
| ख | वस्तुकला; स्थापत्य (Engineering) | D |
| ग | रसायन (Chemistry) | E |
| घ | रसायनकला (Technology) | F |
| च | जीवनशास्त्रें (Biological Sciences) | G |

| | | |
|---|---|---|
| छ | भूगर्भशास्त्र ( Geology ) | H |
| छा | खनिजशास्त्र ( Mining ) | η (Eta) |
| ज | वनस्पतिशास्त्र ( Botany ) | I |
| झ | कृषिशास्त्र ( Agriculture ) | J |
| ट | प्राणिशास्त्र ( Zoology ) | K |
| ठ | प्राणिकला ( Animal husbandry ) | λ (Lambda) |
| ड | वैद्यक ( Medicine ) | L |
| ढ | उपयुक्तकला ( Useful Arts ) | M |
| ण | मनोविद्याशास्त्रें आणि समूहशास्त्रें ( Humanities and Social Sciences ) | μ (Mu) |
| △ | अध्यात्मविद्या व गूढविद्या ( Spiritual Experience and Mysticism ) | Δ (Delta) |
| त | मनोविद्याशास्त्रें ( Humanities ) | ν ( Nu ) |
| थ | ललितकला ( Fine Arts ) | N |
| द | साहित्य; ललितवाङ्मय ( Literature ) | O |
| न | भाषाशास्त्र ( Linguistics ) | P |
| प | धर्म ( Religion ) | Q |
| फ | तत्त्वज्ञान ( Philosophy ) | R |
| भ | मानसशास्त्र ( Psychology ) | S |
| म | शिक्षणशास्त्र ( Education ) | T |
| य | सामाजिकशास्त्रें; समूहशास्त्रें ( Social Sciences ) | Σ ( Sigma ) |
| र | भूगोल ( Geography ) | U |
| ल | इतिहास ( History ) | V |
| व | राजनीतिशास्त्र ( Political Science ) | W |
| श | अर्थशास्त्र ( Economics ) | X |
| स | समाजशास्त्र ( Sociology ) | Y |
| ह | न्याय ( Law ) | Z |

वरील कोष्टकावरून असें आढळून येईल कीं, त्यात नागरी वर्णमालेंतील काहीं वर्ण गाळले आहेत. असें करण्याचें मुख्य कारण मुख्य वर्गाचे सबधानुसारी पोटगट आणि ध्वनिमूलक वर्णांचे पोटगट यांचें साम्य घडवून आणणें हें होय. हे पोटगट पुढीलप्रमाणें होत.

| इंग्रजी नाव | संस्कृत नाव | वर्ण वर्ग | पाणिनीच्या पद्धतीनें वर्गसूचक संकेत |
|---|---|---|---|
| Tool subjects | करण शास्त्राणि | स्वरवर्गः | इऊ |
| Physical seciences | वस्तुशास्त्रकला. | क वर्गः | एघ |
| Biological „ | जीवशास्त्रकलाः | चट वर्गः | चङ |
| Useful arts | कलाः | ढ वर्गः | ढ |
| Humanities and Social Sciences | मनोविद्याशास्त्राणि समूहशास्त्राणि च | ण वर्गः | $\mu$ |
| Spiritual Experience and Mysticism | अध्यात्मविद्या | △वर्गः (त्रिकोण वर्गः) | △ |
| Humanities | मनोविद्या शास्त्राणि | तमवर्गः | तम |
| Social Sciences. | समूहशास्त्राणि | यवर्गः | यह |

ह्या कोष्टकाचें आणखी एक विशेष असें आहे कीं, मूळ कोष्टकात पुढील वर्गांची उणीव भासत होती ती ह्या कोष्टकानें नाहींशी केलेली आहे.—

| नागरी वर्ण | मुख्य वर्ग | मूळ कोष्टकात नवीनच समाविष्ट केलेलीं बोधचिन्हें |
|---|---|---|
| अ | प्रथालयाचा सर्वांत जास्त आवडता विषय | — |
| आ | प्रथालयाचा दुसरा आवडता विषय | ( –अजून वर्णांची योजना ठरविलेली नाहीं ) |
| उ | गणितशास्त्रें | $\beta$ |
| ए | वस्तुशास्त्रें | I |
| छा | खनिजशास्त्र | $\eta$ |
| ट | प्राणिकला | $\lambda$ |
| ण | मनोविद्याशास्त्रें व समूहशास्त्रें | $\mu$ |
| त | मनोविद्याशास्त्रें | $\nu$ |
| य | समूहशास्त्रें | $\Sigma$ |

वरील वर्गांचा अंतर्भाव नवीन कोष्टकांत केल्यामुळें द्विबिंदु पद्धतीचे मुख्य वर्ग आतां स्वयंपूर्ण झालेले आहेत.

आरंभींच्या मूळ कोष्टकांत सर्व रोमी वर्णांचा उपयोग केलेला असल्यामुळें डॉ. रंगनाथन् यांना ह्या नवीन कोष्टकांतील नवीन समाविष्ट केलेल्या ग्रीक वर्णांचा उपयोग करावा लागला. मूळ कोष्टकांत $\Delta$ हा ग्रीक वर्ण वापरलेला होता. आतां

$\beta$, $\Gamma$, $\eta$, $\lambda$, $\mu$, $\nu$, $\Sigma$,

ह्या आणखी सात ग्रीक वर्णांचा समावेश नवीन कोष्टकांत केलेला आहे.

वरील युक्त मुख्य वर्गांचें आणखी एक विशेष असें आहे कीं, त्यांचे निरानिराळे गट पाडून प्रत्येक गटाचे आरंभीं त्या गटाचा एक सर्वसाधारण वर्ग निर्माण केला आहे. अशा वर्गांना अवशिष्ट मुख्य वर्ग (Residual Main Classes) अथवा अंशतः व्यापक संकीर्ण मुख्य वर्ग (Partially Comprehensive Generalia Main Classes), अशा अन्वर्थक संज्ञा ग्रंथकारानें दिल्या आहेत. असे वर्ग पुढील होत.—

| | | |
|---|---|---|
| इ | विज्ञान (Science) | A |
| उ | गणितशास्त्रें (Mathematical Sciences) | $\beta$ |
| ए | वस्तुशास्त्रें (Physical Sciences) | $\Gamma$ |
| च | जीवशास्त्रें (Biological Sciences) | G |
| ट | उपयुक्त कला (Useful Arts) | M |
| ण | मनोविद्याशास्त्रें आणि समूहशास्त्रें (Humanities and Social Science) | $\mu$ |
| त | मनोविद्याशास्त्रें (Humanities) | $\nu$ |
| थ | समूहशास्त्रें (Social Sciences) | $\Sigma$ |

वर निर्दिष्ट केलेल्या विषयांवर अलीकडे स्वतंत्र ग्रंथ व नियतकालिकें प्रसिद्ध होत आहेत. म्हणून अशा वर्गांची मुख्य वर्गांचे तक्त्यांत योजना होणें अत्यावश्यक होतें. आतां ती उणीव भरून काढल्यामुळें ह्या पद्धतीचे मुख्य वर्गांचा तक्ता अगदीं स्वयंपूर्ण झाला आहे.

युक्त मुख्य वर्गांच्या गटाविषयीं विशेष खुलासा

उ ( गणितशास्त्रें ) पासून ढ ( उपयुक्त कला ) पर्यंतचे वर्ग इ ( विज्ञान) ह्या वर्गाचे उपविभाग आहेत तसेंच क ( पदार्थविज्ञान ) पासून घ (रसायनकला) पर्यंत वर्गांचा गट हा वस्तुशास्त्राचा गट आहे व त्या गटांतील सर्व वर्ग ए ( वस्तुशास्त्रें ) ह्या वर्गाचे उपविभाग आहेत छ ( भूगर्भशास्त्र ) पासून ङ (वैद्यक ) पर्यंतच्या वर्गांचा गट हा जीवनशास्त्राचा गट आहे व त्या गटांतील सर्व वर्ग च ( जीवनशास्त्रें ) ह्या वर्गाचे उपविभाग आहेत. △ (अध्यात्म विद्या ) हा एक स्वतंत्र वर्ग आहे. विज्ञानशास्त्रें व व मनोविद्याशास्त्रे या दोहोंचा आध्यात्मिक दृष्टीनें विचार करणारें असें अध्यात्म शास्त्र असल्यामुळें त्याला मुख्य वर्गाचें केंन्द्रस्थान दिलें आहे. थ (ललित-कला ) पासून ह ( न्याय ) पर्यंतच्या वर्गांचा गट हा मनोविद्याशास्त्राचा गट आहे व त्या गटांतील सर्व वर्ग त ( मनोविद्याशास्त्रें ) ह्या वर्गाचे उपविभाग आहेत. मनोविद्याशास्त्राचे पुन्हा दोन गट केले आहेत, पैकीं र ( भूगोलशास्त्र ) पासून ह ( न्याय ) पर्यंतच्या वर्गांचा गट हा समूहशास्त्राचा गट आहे व त्या गटांतील सर्व वर्ग य ( समूहशास्त्रें ) ह्या वर्गाचे उपविभाग आहेत. थ ( ललितकला ) पासून म ( शिक्षणशास्त्र ) पर्यंतच्या वर्गांचा गट हा बाकीच्या मनोविद्याशास्त्राचा गट आहे

ह्या गटामधील वर्गांत एक प्रकारची उपयुक्त रचना आहे व तशीच उपयुक्त रचना गटामध्यें सुद्धा आहे.

चौथें मंडल ( Fourth Zone )

ह्या मंडलात जे वर्ग समाविष्ट केले आहेत ते सामान्य उपविभागापासून व युक्त मुख्य वर्गांपासून निर्माण झालेले आहेत. त्यामुळें त्यांचीं बोधचिन्हें स्मृतीला सुलभ व्हावीत म्हणून तींच वापरलीं आहेत. ह्या मंडळातील चिन्हांचा गट निराळा दाखविता यावा म्हणून तीं मुद्दाम कंसात दाखविलीं आहेत, त्यांना वेष्टित चिन्हें ( Packeted Notation ) ही संज्ञा दिली आहे व त्यांचें स्थानमूल्य नागरी वर्णमालेच्या अक्षरांचेनंतर अथवा रोमी ठोंकळ अक्षरांचेनंतर ठरविलें आहे. अशाप्रकारें बोधचिन्हांचा जो उपयोग करण्यांत येतो त्याला विषय युक्ति ( Subject Device ) असें नाव

ग्रंथकारानें दिलें आहे. ह्या युक्तीविषयीची जास्त माहिती प्रकरण १३ ( स्मृतिसाधनें ) मध्यें दिली आहे. ह्या मंडलांतील मुख्य वर्गांत ज्या विषयांचा अंतर्भाव केला आहे त्या विषयांवरसुद्धां अलीकडे थोडेंफार वाङ्मय प्रकाशित होऊं लागलें आहे. ग्रंथांच्या सूचि तयार कशा कराव्यात ह्याबद्दलचें तंत्र ज्या ग्रंथांत दिलें जातें अशा विषयाला " ग्रंथवर्णनविद्या " असें नांव दिलें आहे. अशा प्रकारच्या विधिविद्या ( Methodologies ) व तंत्रें ह्या मंडलांत समाविष्ट केलीं आहेत.

नवीन निर्माण होणाऱ्या विधिविद्या

( Newly emerging methodologies )

( १ ) अग्रवर्ति सामान्य उपविभागांच्या अथवा आगम साधन भागांच्या तंत्रनिदर्शक विधिविद्या ( Methodologies of the category of the Anteriorising Common Subdivisions or Approach material )

| | | |
|---|---|---|
| ( इं ) | ग्रंथवर्णनविद्या ( Bibliographology ) | ( *a* ) |
| ( झं ) | स्मृतिग्रंथविद्या ( Festschriftology ) | ( *j* ) |
| ( टं ) | ज्ञानकोशविद्या ( Encyclopaediology ) | ( *k* ) |
| ( नं ) | सम्मेलनतंत्र ( Conference technique ) | ( *p* ) |
| ( फं ) | अहवाल लेखन तंत्र ( Technique of report writing ) | ( *r* ) |
| ( मं ) | समिति तंत्र ( Commission technique ) | ( *t* ) |
| ( वं ) | चरित्र तंत्र ( Biographology ) | ( *w* ) |
| ( वं१ ) | आत्मचरित्र तंत्र ( Autobiographology ) | ( *w*1 ) |

( २ ) सामान्य ऊर्जा विभागांपासून निर्माण झालेल्या बुद्धिगम्य कार्य तंत्र विधिविद्या ( Methodologies of the category of the Intellectual Activities stemming from Common Energy Isolates)

| | | |
|---|---|---|
| ( हं१इं ) | उपन्यास कला; अनुमान कला ( Art of making hypothesis ) | ( *z*1*a* ) |

| | | |
|---|---|---|
| ( हं१ऊं ) | आदर्श सिद्धांत रचना कला ( Art of framing normative principles ) | ( *z1b* ) |
| ( हं१कं ) | शासन शोध कला ( Art of deriving law ) | ( *z1c* ) |
| ( हं१चं ) | टीका तंत्र ( Art of criticism ) | ( *z1g* ) |
| ( हं१टं ) | व्याख्या तंत्र ( Art of definition ) | ( *z1k* ) |
| ( हं१ढं ) | निरीक्षण तंत्र ( Art of observation ) | ( *z1m* ) |
| ( हं१थं ) | प्रयोग तंत्र ( Art of experimentation ) | ( *z1n* ) |
| ( हं१सं ) | शास्त्रीय पद्धत ( Scientific method ) | ( *z1y* ) |

( ३ ) सामान्य ऊर्जा विभागांपासून निर्माण झालेल्या व्यवसाय कार्य तंत्र विधिविद्या ( *Methodologies of the Category of Industrial* Activity stemming from Common Energy Isolates ).

| | | |
|---|---|---|
| ( हं२इ ) | योजना तंत्र ( Planning ) | ( *z2a* ) |
| ( हं२खं ) | प्रतिमाकार्य ( Model making ) | ( *z2d* ) |
| ( हं२गं ) | किरकोळ कामाचें पृथकरण ( Job analysis ) | ( *z2e* ) |
| ( हं२घं ) | नित्यक्रम ( Routine ) कामाचा तक्ता ( Work chart ) | ( *z2f* ) |
| ( हं२ढं ) | शेवटच्या संस्कार ( Finishing ) | ( *z2m* ) |
| ( हं२थं ) | कसोटी; परीक्षा ( Testing ) | ( *z2n* ) |
| ( हं२नं ) | बांधाबांध ( Packing ) | ( *z2p* ) |
| ( हं२वं ) | निरुपयोगी अवशेष उपयोग ( Waste utilisation ) | ( *z2w* ) |

( ४ ) सामान्य ऊर्जाविभागांपासून निर्माण झालेल्या संस्था कार्य विधिविद्या ( Methodologies of the Category of Institutional Activity *stemming* from Common Energy Isolates )

| | | |
|---|---|---|
| ( हं३चं ) | कार्यवाह कार्य ( Secretarial work ) | ( *z3g* ) |

| | | |
|---|---|---|
| ( हं३छं ) | संघटना ( Organisation ) | ( z3h ) |
| ( हं३झं ) | कार्यक्रम पत्रिका कार्य ( Agenda ) | ( z3j ) |
| ( हं३टं ) | सभासंचालन (Conduct of meeting) | ( z3k ) |
| ( हं३ढं ) | सभाटाचण कार्य; सभावृत्तांत कार्य ( Minutes work ) | ( z3m ) |
| ( हं३पं ) | व्यवस्था ( Management ) | ( z3q ) |
| ( हं३फं ) | शोध तंत्र ( Exploration Technique ) | ( z3r ) |
| ( हं३यं ) | कारभार ( Administration ) | ( z3w ) |
| ( हं३सं ) | परीक्षण तंत्र ( Review Technique) | ( z3y ) |

( ५ ) सामान्य परवर्ती व्यक्तित्व विभाग "व्यवसाय" ह्यापासून निर्माण झालेल्या विधिविद्या ( Methodologies stemming from posteriorising Personality Isolate " Profession " ).

| | | |
|---|---|---|
| ( हं७अं ) | व्यवसायाचें तत्त्व व कला ( Theory and art of Profession ) | ( z7b ) |
| ( हं७खं ) | संस्था ( Institution ) | ( z7d ) |
| ( हं७गं ) | पदार्थ संग्रहालय विद्या; अजबालय ( Museology ) | ( z7e ) |
| ( हं७घं ) | संशोधन संस्था ( Learned Society ) | ( z7f ) |
| (हं७चं२) | अवलोकन संस्था; निरीक्षण संस्था ( Observational institution ) | (z7g2) |
| ( हं७चं३) | प्रयोगशाळा ( Laboratory ) | (z7g3 ) |
| ( हं७चं४) | सार्वजनिक जागा; न्यायस्थान ( Forum ) | (z7g4 ) |
| ( हं७चं५) | आश्रम | (z7g5 ) |

( ६ ) युक्त मुख्य वर्गापासून निर्माण झालेल्या विधिविद्या ( Methodologies emerging from Proper Main Classes )

(ट) प्रमाणीकरण विद्या (Methodology of Standardisation) (M)
(न) विज्ञापनविद्या; निवेदनविद्या (Methodology of Communication in the general sense) (P)
(श) व्यवस्था तंत्र (Management in general) (X)
(स) लोकसंबंध (Public relations) (Y)

मुख्य वर्गांची संख्या

वरील कोष्टकांवरून हें मुख्य वर्गांचें कोष्टक किती विशद व व्यापक झालें आहे याची वाचकांना सहज कल्पना येईल. ह्या कोष्टकांत ह्या पद्धतीचे एकंदर १०८ मुख्य वर्ग दाखविले आहेत त्यांची मंडलपरत्वें विभागणी पुढीलप्रमाणें होते.

| मंडल | मुख्य वर्गांची संख्या |
| --- | --- |
| पहिलें मंडल | ११ |
| दुसरें मंडल | १३ |
| तिसरें मंडल | ३९ |
| चौथें मंडल | ४५ |

इतकी मोठी, विशद व सुसघटित मुख्य वर्गांची संख्या जगांत सध्या ज्या कांहीं प्रचलित वर्गीकरणपद्धति आहेत त्यांपैकीं कोणत्याहि पद्धतींत नाहीं. मुख्य वर्गांचा एवढा मोठा उच्चांक फक्त द्विबिन्दु पद्धतीनेंच गांठला आहे. व हा उच्चांक ह्या पद्धतीच्या ग्रंथकारानें मोठ्या कौशल्यानें तिला मिळवून दिला आहे.

प्रकरण ४ थें

# तयार वर्गांकांचा वर्गीकृत तक्ता

ह्या शास्त्रीय वर्गीकरण पद्धतीप्रमाणें लहान लहान ग्रंथालयांतिल ग्रंथ-पालांना वर्गांक तयार करण्याचें तंत्र प्रथम समजून घेऊन मग वर्गांक तयार करणें कठीण वाटणें साहजिक आहे. म्हणून ह्या प्रकरणांत साधारणपणें २५००० ग्रंथांचें वर्गीकरण करण्यास उपयोगी पडेल असा तयार वर्गांकांचा वर्गीकृत तक्ता दिला आहे; व प्रकरण ५ मध्यें ह्या तक्त्यांतिल विषयांची वर्णानुक्रम सूचि दिली आहे. ह्या दोन तक्त्यांचे साहाय्यानें बऱ्याच ग्रंथांना सहजरीतीनें वर्गांक देणें ग्रंथपालांना शक्य होईल व असे वर्गांक कित्येक ग्रंथांना दिल्यावर त्यांतील बोधचिन्हांची मांडणी कोणत्या कोष्टकांच्या व नियमांच्या आधारानें केली आहे हें समजून घेण्याची इच्छा त्याचें मनांत निर्माण होईल म्हणून ती माहिती प्रकरण ६ पासून पुढील प्रकरणांत दिली आहे.

**इं-टं संकीर्ण वाङ्मय प्रकार मुख्य वर्ग**

*a–z* General Form Main Classes

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| इं | *a* | संकीर्ण ग्रंथसूचि (General bibliography) |
| इं१२ | *a*12 | हस्तलिखितांची सूचि |
| इं१२-३१५ | *a*12-315 | संस्कृत हस्तलिखितांची सूचि |
| इं१२-३१५२ | *a*12-3152 | हिंदी हस्तलिखितांची सूचि |
| इं१२-३१५४ | *a*12-3154 | गुजराथी ,, ,, |
| इं१२-३१५५ | *a*12-3155 | मराठी ,, ,, |
| इं१२-३३३ | *a*12-333 | कानडी ,, ,, |
| टं | *k* | संकीर्ण ज्ञानकोश (General encyclopaedia) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| टं१ | *k*1 | जगाचा ज्ञानकोश |
| टं२ | *k*2 | भारताचा ज्ञानकोश |
| ढं | *m* | संकीर्ण कालिकें (General periodicals) |
| ढं२ | *m*2 | भारतांतील कालिकें |
| ढं२१५ | *m*215 | कर्नाटकांतील कालिकें |
| ढं२३३ | *m*233 | महाराष्ट्रांतील कालिकें |
| ढं२३५ | *m*235 | गुजरार्थेतील कालिकें |
| वं | *w* | संकीर्ण चरित्रें (General biographies) |
| वं२ | *w*2 | भारतीयांचीं चरित्रें |
| वं२१५ | *w*215 | कर्नाटकीयांचीं चरित्रें |
| वं२३३ | *w*233 | महाराष्ट्रीयांचीं चरित्रें |
| वं२३५ | *w*235 | गुजराथीयांचीं चरित्रें |
| शं | *x* | संकीर्ण ग्रंथ (Collections) |
| शं२ | *x*2 | भारतीयांचे संकीर्ण ग्रंथ |
| शं२१५ | *x*215 | कर्नाटकीयांचे संकीर्ण ग्रंथ |
| शं२३३ | *x*233 | महाराष्ट्रीयांचे संकीर्ण ग्रंथ |
| शं२३५ | *x*235 | गुजराथीयांचे संकीर्ण ग्रंथ |

हं संकीर्ण मुख्य वर्ग
*z* Generalia Main Classes

| | | |
|---|---|---|
| हं४ | *z*4 | पौर्वात्य विद्या (Orientalia) |
| हं४१ | *z*41 | चिनी विद्या (Sinology) |
| हं४४ | *z*44 | भारतीय विद्या (Indology) |
| हं५ | *z*5 | पाश्चिमात्य विद्या (Occidentalia) |
| हं७ | *z*7 | अमेरिकेंतील विद्या (Americana) |

१-९ अर्वाचीन काळांत मान्यता पावलेले व युक्त मुख्य वर्गांत ज्यांचा समावेश करतां येत नाहीं असे मुख्य वर्ग.

1-9 Recently recognised main classes which cannot be accommodated in the proper main classes.

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| १ | 1 | ज्ञान विश्व ( Univeıse of knowledge ) |
| २ | 2 | ग्रंथालय शास्त्र ( Library science ) |
| २:५१ | 2:51 | वर्गीकरण ( Classification ) |
| २:५५ | 2:55 | सूचीकरण ( Cataloguing ) |
| २:७ | 2:7 | संदर्भ सेवा(Reference service) |
| २:८ | 2:8 | व्यवस्था ( Administration ) |
| २१३ | 215 | राष्ट्रीय ग्रंथालय ( National library ) |
| २२ | 22 | सार्वजनिक ग्रंथालय ( Public library ) |
| २२१ | 221 | जिल्हा ग्रंथालय( District library ) |
| २२११ | 2211 | ग्राम ग्रंथालय (Village library) |
| २२२ | 222 | शहर ग्रंथालय ( City library ) |
| २६१ | 261 | शिशु ग्रंथालय ( Children's library ) |
| २६५ | 265 | महिला ग्रंथालय ( Women's library ) |
| ३ | 3 | ग्रंथ शास्त्र ( Book science ) |
| ४ | 4 | नियतकालिक प्रकाशनकला (Periodical Publicationism) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ५ | 5 | विज्ञापनविद्या; निवेदनविद्या ( Communicationism ) |
| ७ | 7 | संपादनविद्या ( Editing technique ) |
| ७२ | 72 | सूचि तंत्र ( Indexing technique ) |
| ९४ | 94 | युद्धविद्या ( Science of war ) |
| ९थ१ | 9N1 | संकीर्ण शब्दार्थ विकासविज्ञान; शब्द विज्ञान(Generalia Semantics) |
| ९थ२ | 9N2 | तर्कशुद्ध वाक्यरचना विद्या ( Logical Syntax ) |
| ९थ३ | 9N3 | गणित तत्वविद्या ( Principia Mathematica ) |

## इ विज्ञान

## A Science

| | | |
|---|---|---|
| इइ | A*a* | विज्ञान ग्रंथसूचि ( Bibliography of Science |
| इट | A*k* | विज्ञान ज्ञानकोश ( Encyclopaedia of Science ), विज्ञान शब्दकोश ( Dictionary of Science ) |
| इड | A*m* | विज्ञान कालिकें ( Periodicals in Science ) |
| इवं | A*w* | शास्त्रज्ञांचीं चरित्रें ( Biographies of Scientists ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| इशं | Ax | शास्त्रीय संकीर्ण ग्रंथ ( Collected works in Science ) |
| इ | A | विज्ञान ( Science ) |
| इ९ल | A9V | संरक्षणशास्त्र ( Defence Science ) |

उ गणितशास्त्रें

β Mathematical Sciences

ऊ गणित

B Mathematics

| | | |
|---|---|---|
| ऊ१ | B1 | अंकगणित ( Arithmetic ) |
| ऊ२ | B2 | बीजगणित ( Algebra ) |
| ऊ३ | B3 | पृथक्करण ( Analysis ) |
| ऊ३२ | B32 | कलन ( Calculus ) |
| ऊ३२१ | B321 | शून्यलब्धि ( Differential ) |
| ऊ३२५ | B325 | समाहार ( Integral ) |
| ऊ५ | B5 | त्रिकोणमिति ( Trigonometry ) |
| ऊ५२ | B52 | रेखा त्रिकोणमिति(Plane Trigonometry ) |
| ऊ६ | B6 | भूमिति ( Geometry ) |
| ऊ६:५ | B6:5 | वर्णनात्मक भूमिति ( Descriptive geometry ) |
| ऊ६:६ | B6:6 | शुद्ध भूमिति (Pure geometry) |
| ऊ६:ऊ१ | B6:B1 | महत्त्वमापन ( Mensuration ) |
| ऊ६२ | B62 | रेखा भूमिति (Plane geometry) |
| ऊ६२:२ | B62:2 | वैजिक भूमिति ( Analytical geometry ) |
| ऊ६२२ | B622 | शांकव गणित ( Conics ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ऊ६२२:२ | B622:2 | बैजिक शांकव ( Analytical conics ) |
| ऊ६२२:६ | B622:6 | शुद्ध शांकव ( Pure conics ) |
| ऊ७ | B7 | यामिक ( Mechanics ) |
| ऊ७१ | B71 | स्थाणु; घनद्रव्यें ( Solids ) |
| ऊ७१:२ | B71:2 | गतिशास्त्र; प्रेरकीय (Dynamics) |
| ऊ७१:३ | B71·3 | स्थितियामिक ( Statics ) |
| ऊ७५ | B75 | द्रवयामिक ( Liquids ) |
| ऊ७५:२ | B75:2 | प्रवाही वैगिकी; जलगतिशास्त्र ( Hydrodynamics ) |
| ऊ५:३ | B75:3 | तरल-स्थैकिकी; जलस्थितिशास्त्र ( Hydrostatics ) |
| ऊ९ | B9 | ज्योतिष ( Astronomy ) |
| ऊ९:१ | B9:1 | कालगणनविद्या ( Chronology ) |
| ऊ९१ | B91 | पृथ्वी; जग; विश्व ( Earth ) |
| ऊ९२ | B92 | चंद्र ( Moon ) |
| ऊ९३ | B93 | सूर्य ( Sun ) |
| ऊ९४ | B94 | ग्रह ( Planet ) |
| ऊ९५ | B95 | धूमकेतु; शेंडे नक्षत्र ( Meteor and Comet ) |
| ऊ९६ | B96 | तारे ( Stars ) |

### ए वस्तुशास्त्रें
### Γ Physical Sciences

### क पदार्थविज्ञान; वास्तव
### C Physics

| | | |
|---|---|---|
| क२ | C2 | द्रव्यगुण ( Properties of Matter ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
| --- | --- | --- |
| क२१ | C21 | घन ( Solid ) |
| क२१६ | C216 | स्फटिक ( Crystal ) |
| क२५ | C25 | द्रव ( Liquid ) |
| क२५:६१ | C25:61 | केशाकर्षण ( Capilarity ) |
| क२५:६२ | C25:62 | तळ-आतति; पृष्ठ वितति; पृष्ठकर्षण ( Surface tension ) |
| क२५:६३ | C25:63 | चिकटपणा; स्निग्धता ( Viscosity ) |
| क२८ | C28 | वायु ( Gas.) |
| क२८ | C28:76 | शून्यक; शून्यावकाश (Vacuum) |
| क३ | C3 | ध्वनि ( Sound ) |
| क४ | C4 | उष्णता ( Heat ) |
| क४:२ | C4:2 | तपमापनविद्या (Thermometry) |
| क४:३१ | C4:31 | उष्णतामापन; उष्णता मोजण्याचें परिमाण ( Calorimetry ) |
| क४:३३ | C4·33 | विशिष्ट उष्णता (Specific heat) |
| क४:४ | C4:4 | अंगविस्तार Expansion of body ) |
| क४:५ | C4:5 | स्थितिबदल (Change of State) |
| क५ | C5 | प्रकाश ( Light ); किरणविसर्जन ( Radiation ) |
| क५:३ | C5:3 | विच्छिन्न किरणानें तपासण्याची क्रिया ( Spectroscopy ) |
| क५१ | C51 | दृश्य किरण ( Visible ray ) |
| क५२ | C52 | पारजम्बु रश्मि; पारनील लोहित किरण ( Ultra violet ray ) |
| क५३ | C53 | क्ष-किरण ( X-ray ) |
| क५६ | C56 | अधोरक्त किरण (Infra-red ray) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| क५७ | C57 | हर्ट्झ् संशोधित लहरी ( Hertzian wave ) |
| क६ | C6 | विद्युत् ( Electricity ) |
| क६२ | C62 | प्रवाही विद्युत् (Current electricity ) |
| क६३ | C63 | स्थायीय विद्युत् / स्थैतिक ,, / स्थितीय ,, } Statical electricity |
| क७ | C7 | चुंबकत्व ( Magnetism ) |
| क९ऊ२–क८४ | C9B2–C84 | अणुशक्ति ( Atomic energy ) |
| कट | CK | गुरुत्वाकर्षण ( Gravitation ) |
| कढ | CM | जडगतिवाद ( Kinetic theory) |
| कढ९ | CM9 | विद्युत् परमाणुवाद ( Electron theory ) |
| कढ९६ | CM96 | तेजोद्गिरण; तेजोद्गिरता ( Radioactivity ) |
| कथ | CN | सापेक्षवाद ( Relativity ) |
| कथ१ | CN1 | तेजः कणवाद; कणवाद ( Quantum theory ) |
| कथ२ | CN2 | तरंगयन्त्रशास्त्र; तरंगगतीविज्ञान ( Wave mechanics ) |

### ख रचनाकला; स्थापत्य
### D Engineering

| | | |
|---|---|---|
| ख१ | D1 | नगरनिर्माण स्थापत्य ( Civil engineering ) |
| ख२ | D2 | पाटबंधारे काम ( Irrigation ) |
| ख३ | D3 | भवन निर्माणशास्त्र ( Building engineering ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख४ | D4 | वाहतुक – रस्ता ( Transport track ) |
| ख४१ | D41 | जमिनिवरील वाहतुक ( Land transport ) |
| ख४११ | D411 | रस्ता; रहदारीचा मार्ग ( Road; highway ) |
| ख४१५ | D415 | रेल्वेरस्ता ( Rail road ) |
| ख४२ | D42 | पाण्यावरील वाहतुक ( Water transport ) |
| ख४२,८ | D42,8 | बंदर ( Harbour ) |
| ख४३ | D43 | हवेंतील वाहतुक ( Air transport ) |
| ख५ | D5 | वाहतुक-वाहन ( Transport-vehicle ) |
| ख५१२१ | D5121 | खेडेगांवांतील गाडी ( Country cart ) |
| ख५१२५ | D5125 | दुचाकी-तिचाकी गाडी ( Cycle ) |
| ख५१३२ | D5132 | मोटार मालगाडी (Motor truck) |
| ख५१३३ | D5133 | मोटार उतारू गाडी ( Motor car ) |
| ख५१५ | D515 | रेल्वे गाडी ( Railway carriage ) |
| ख५२५ | D525 | जहाज ( Ship ) |
| ख५२५४ | D5254 | पाणबुडी ( Submarine ) |
| ख५३ | D53 | हवाईवाहन ( Air vehicle ) |
| ख५३१ | D531 | संचाल्य ( Dirigible ) |
| ख५३५ | D535 | विमान ( Aeroplane ) |
| ख६ | D6 | यन्त्रस्थापत्य ( Mechanical engineering ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख६,६ | D6,6 | यंत्रें ( Machinery ) |
| ख६,७ | D5,6 | सामान्य यंत्रें ( General Machinery ) |
| ख६,७१ | D6,71 | उच्चालन यन्त्र ( Lift ) |
| ख६,७११ | D6,711 | जड वजन उचलण्याची यारी ( Jack, derrick ) |
| ख६,७१२ | D6,712 | माल वगैरे वर चढविण्याचें यंत्र ( Elevator ) |
| ख६,७२ | D6,72 | माल वगैरे एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर नेण्याचा यंत्री पाळणा ( Hoisting machine ) |
| ख६,७३ | D6,73 | वाहन यंत्र ( Conveying machine ) |
| ख६,७४ | D6,74 | दाबणारें यंत्र ( Pressing machine ) |
| ख६,८ | D6,8 | कारखान्यांतील यंत्रें ( Workshop machinery ) |
| ख६,८१ | D6,81 | समतल निर्माण यंत्रें ( Planing machinery ) |
| ख६,८११ | D6,811 | रंधा ( Planer ) |
| ख६,८१२ | D6,812 | सारखा आकार देण्याचें यंत्र ( Shaper ) |
| ख६,८१३ | D6,813 | खांच पाडणारें यंत्र ( Slotting machine ) |
| ख६,८१४ | D6,814 | खोगदा-पन्हाळ-खोदणारें यंत्र ( Grooving machine ) |
| ख६,८२ | D6,82 | कातकाम यंत्र ( Turning machine ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख६,८२१ | D6,821 | कातकामाचा चरक ( Lathe ) |
| ख६,८२४ | D6,824 | स्क्रू पाडण्याचें यंत्र ( Screw cutting machine ) |
| ख६,८२५ | D6,825 | दांते किंवा कंगोरे पाडण्याचें यंत्र ( Milling machine ) |
| ख६,८३१ | D6,831 | करवत ( Saw ) |
| ख६,८३५ | D6,835 | पातें ( Shear ) |
| ख६,८४ | D6,84 | सारखीं भोकें पाडण्याचें यंत्र ( Perforating machine ) |
| ख६,८४१ | D6,841 | भोकें पाडण्याचें यंत्र (Punching machine ) |
| ख६,८४१८ | D6,8414 | अनेक भोकें पाडण्याचें यंत्र ( Multiple Punching machine ) |
| ख६,८४६ | D6,845 | सामता ( Drilling machine ) |
| ख६,८५१ | D6,851 | कानस ( File ) |
| ख६,८५२ | D6,852 | एमरी चाक ( Emary wheel ) |
| ख६,८५३ | D6,853 | सहाण ( Grind Stone ) |
| ख६,८५४ | D6,854 | घांसणी (Abrasive machine) |
| ख६,८६ | D6,86 | वांकवणारें व सरळ करणारें यंत्र ( Bending and Straightening ) |
| ख६,८७ | D6,87 | हातोडी ( Hammer ) |
| ख६,८८ | D6,88 | चिरडण्याचें-भरडण्याचें यंत्र ( Crushing machine ) |
| ख६,९ | D6,9 | इतर यंत्रें (विषययुक्तीचें साहाय्यानें ) |
| ख६,९ख२०१ | D6,9D201 | खोदण्याचें यंत्र ( Excavating machine ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
| --- | --- | --- |
| ख६,९ख८५ | D6,9D85 | द्रव चढविण्याचें यंत्र ( Pumping machine ) |
| ख६,९ठ१४ | D6,9M14 | मुद्रण यंत्र ( Printing machine ) |
| ख६,९ठ७ | D6,9M7 | विणण्याचीं यंत्रें ( Textile machinery ) |
| ख६,९ठक४२१ | D6,9MC421 | गार करण्याचें यंत्र; शीतक यंत्र ( Refrigerating machine ) |
| ख६,९ठझ३८ | D6,9MJ38 | पिठाची गिरणी ( Flouring machine ) |
| ख६,९ठझ३८१ | D6,9MJ381 | भात सोलण्याचें-कांडण्याचें यंत्र ( Rice husking machine ) |
| ख६२ | D62 | यंत्ररचना मूलतत्त्वें आणि विशिष्ट युक्ति ( Principles of mechanism and special device ) |
| ख६२१ | D621 | धुरा किंवा वाटोळा दांडा बनविणारीं यत्रें (Shafting machinery) |
| ख६२११ | D6211 | धुरा; वाटोळा दांडा ( Shaft ) |
| ख६२११५ | D62115 | लवचिक दाडा ( Flexible Shaft ) |
| ख६२१२ | D6212 | खोबण ( Bearing ) |
| ख६२१२१ | D62121 | दांड्याच्या फिरणाऱ्या भागाची खोबण ( Journal bearing ) |
| ख६२१२२ | D62122 | उशी ( Pillow block ) अडकवण्याचा कंस; खुंटी ( Hanger bracket ) |
| ख६२१२३ | D62123 | तीक्ष्णाग्र खोबण (Pivot bearing) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख६२१२४ | D62124 | मायनीची खोबण ( Collar bearing ) |
| ख६२१२५ | D62125 | गोलाची खोबण आणि रुळाची खोबण ( ball bearing and roller bearing ) |
| ख६२२ | D622 | पट्ट्याचें दाताळें चाक ( belt gearing ) |
| ख६२२१ | D6221 | खोबणीचें चाक, कप्पी ( Pulley) |
| ख६२२२ | D6222 | पट्टा ( Belting ) |
| ख६२२३ | D6223 | पट्टा हलवणारें यंत्र ( Belt shifter ) |
| ख६२२४ | D6224 | दोर सरकवणारें यंत्र ( Rope transmitter ) |
| ख६२२५ | D6225 | सांखळीचें दाताळें चाक ( Chain gearing ) |
| ख६२२६ | D6226 | कडीला पट्टा लावणें ( Link belting ) |
| ख६२३ | D623 | दातांचें चाक ( Toothed gearing )<br>भ्रमण यंत्र, डुमणें ( Cam ) |
| ख६२४ | D624 | स्क्रू ( Screw ) |
| ख६२५ | D625 | स्थितिस्थापक यंत्र ( Spring ) |
| ख६२६ | D626 | घडीच्या दाराचें चाक; पडद्याचें चाक ( Valve gear ) |
| ख६२७ | D627 | स्निग्धीकरण, बुळबुळीत करण्याची क्रिया ( Lubrication ) |
| ख६२९१ | D6291 | नियामक यंत्र ( Governor, regulation and control ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख६२९२ | D6292 | गति आणि परिवर्तन निदर्शनी (Speed and revolution indicator) |
| ख६२९६ | D6296 | शक्तिमापक यंत्र (Dynamometer) |
| ख६३५ | D635 | जलयंत्र स्थापत्य (Hydraulic engineering) |
| ख६३५१ | D6351 | जल-चक्र (Water wheel) |
| ख६३५३ | D6353 | दाब यंत्र; चेपण यंत्र (Piston engine) |
| ख६३५५ | D6355 | पाणचक्की (Turbine) |
| ख६३८ | D638 | वायु स्थापत्य (Pneumatic engineering) |
| ख६३८१ | D6381 | पवनचक्की (Wind-mill) |
| ख६३८५ | D6385 | पवनचक्की (Turbine) |
| ख६३८७ | D6387 | संकलित वायु (Compressed air) |
| ख६४ | D64 | ताप यंत्र; उष्णतेचें यंत्र (Heat engine) |
| ख६४१ | D641 | वाष्पयंत्र; वाफेचें यंत्र (Steam engine) |
| ख६४३ | D643 | दाबयंत्र (Piston engine) |
| ख६४५ | D645 | तापचक्की (Turbine) |
| ख६४६ | D646 | अन्तर्ज्वलन यंत्र; अंन्तर्दाह यंत्र (Internal Combustion engine) |
| ख६४६५ | D6465 | तेल इंजिन; तेलाच्या वाफेनें चालणारें यंत्र (Oil engine) |

H 4263 ५९

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख६४६६ | D6466 | डीझल्वाल यंत्र (Diesel engine) |
| ख६४६७ | D6467 | वायु यंत्र ( Gas engine ) |
| ख६४६८ | D6468 | उष्ण वायु यंत्र ( Hot air engine ) |
| ख६६ | D66 | विद्युत् यंत्र स्थापत्य ( Electrical engineering ) |
| ख६६,५ | D66,5 | प्रकाशन, प्रकाश करणें ( Illumination ) |
| ख६६३ | D663 | सरळ प्रवाह, ऋजु प्रवाह ) ( Direct current ) |
| ख६६४ | D664 | एकांतर प्रवाह ( Alternating current ) |
| ख६६५ | D665 | मंद प्रवाह ( Week current ) |
| ख६६५,४७ | D665,47 | दूरलेखन ( Telegraphy ) |
| ख६६५,४८ | D665,48 | दूरभाषण ( Telephony ) |
| ख६६६ | D666 | बिनतारी ( Wireless ) |
| ख६६६,४५ | D666,45 | दूरवीक्षण ( Television ) |
| ख६६६,४८५ | D666,485 | ध्वनिप्रसारण; आकाशवाणी ( Broadcasting ) |
| ख७ | D7 | परमाणुकेंद्र स्थापत्य ( Nuclear engineering ) |
| ख८ | D8 | नगरसुधार स्थापत्य ( Municipal and sanitary engineering) |
| ख८५ | D85 | जल पूर्ति, पाणीपुरवठा ( Water supply ) |
| ख८५१४ | D8514 | भूमिगत ( Undergronnd ) |
| ख८५१४१ | D85141 | कूप, विहीर ( Well ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख८५१४४ | D85144 | नलकूप; कारंजाची विहिर (Artesian well) |
| ख८५१७ | D8517 | नदी (River) |
| ख८५१८ | D8518 | जलधार; तलाव; टाकी (Reservoir, tank, lake) |
| ख८५४ | D854 | दूषण (Pollution) |
| ख८५५ | D855 | शुद्धीकरण (Purification) |
| ख८५५१ | *D8551* | यांत्रिक उपचार (*Mechanical* Treatment) |
| ख८५५११ | D85511 | निवळणें (पाणी) (Settling) |
| ख८५५१२ | D85512 | गाळण्याची पद्धति (Filtration) |
| ख८५५१२१ | D855121 | नैसर्गिक (Natural) |
| ख८५५१२२ | D855122 | वाळू (Sand) |
| ख८५५१२८ | D855128 | गाळणी (Filter) |
| ख८५५२ | D8552 | वास्तवी उपचार (Physical Treatment) |
| ख८५५२५ | D85525 | पारजम्बुरश्मि उपचार (Ultra *violet ray treatment*) |
| ख८५५२६ | D85526 | विद्युत्-उपचार (Electrical treatment) |
| ख८५५३ | D8553 | रासायनिक उपचार (Chemical Treatment) |
| ख८५६ | D856 | वांटप (Distribution) |
| ख८५६१ | D8561 | बंबानें पाणी चढविण्याचें केंद्र (Pumping station) |
| ख८५६२ | D8562 | पाण्याचा बुरूज (Water tower) |
| ख८५६४ | D8564 | नळ; तोटी (Pipe) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख८५६४१ | D85641 | मुख्य नळ; मुख्य तोटी; प्रधान प्रणाळ ( Main pipe ) |
| ख८५६४५ | D85645 | घराला जोडलेला नळ; गृहसंबध ( Home connection ) |
| ख८५६९८ | D85698 | अपव्यय प्रतिबंध ( Prevention of waste ) |
| ख८६ | D86 | मळ प्रवाह; गटार ( Sewage ) |
| ख८६२ | D862 | गृहसंबध; घराला जोडलेलें गटार ( House connection ) |
| ख८६४ | D864 | मल प्रणाल; नाला; गटार (Sewer) |
| ख८६५ | D865 | बबानें मळ वाहून नेण्याचें केंद्र ( Pumping station ) |
| ख८६६२ | D8662 | मळ प्रवाह क्षेत्र, पाट सोडण्याचें केंद्र ( Irrigation, sewage farm ) |
| ख८६६४ | D8664 | गाळाचा प्रवाहांत निकाल (Disposal into stream, etc) |
| ख८६६५ | D8665 | शोधन; स्वच्छता; शुद्धता ( Purification ) |
| ख८६६६ | D8666 | विपाक्त तलाव; पूययुक्त टाकी; कुजलेल्या मळाची टाकी ( Septic tank ) |
| ख८८ | D88 | शहरांतील गाळ, गांवांतील गाळ ( Municipal refuse and waste ) |
| ख८८२ | D882 | घरांतील गाळाचा सांठा ( House collection ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ख८८५ | D885 | पथ शोधन; रस्त्याची स्वच्छता (Street cleaning) |
| ख८८६ | D886 | गाळाचा निकाल (Refuse disposal) |
| ख९ल४ | D9V4 | युद्ध स्थापत्य (Military engineering) |

ग रसायन

E Chemistry

| | | |
|---|---|---|
| ग:१ | E:1 | सामान्य रसायन (General chemistry) |
| ग:२ | E:2 | पार्थिव रसायन; भौतिक रसायन; (Physical Chemistry) |
| ग:२२ | E:22 | विलयन (Solution) |
| ग:२३२ | E:232 | श्लेषाम, शोषण (Absorption, surface phenomena) |
| ग:२३५ | E:235 | प्रतिस्फटिक; अनुस्फटिक (Colloid) |
| ग:२४ | E:24 | ताप रसायन (Thermochemistry) |
| ग:२५ | E:25 | प्रकाश रसायन (Photochemistry) |
| ग:२६ | E 26 | विद्युत् रसायन (Electrochemistry) |
| ग:२७ | E:27 | चुम्ब रसायन (Magnetochemistry) |
| ग:२८ | E:28 | आकाशीय रसायन; घन रसायन (Stereochemistry) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ग:३ | E:3 | विश्लेष रसायन ( Analytical chemistry ) |
| ग:४ | E:4 | संश्लेष ( Synthesis ) |
| ग:५ | E:5 | निष्कर्षण ( Extraction ) |
| ग:७ | E:7 | देहरसायन ( Biochemistry ) |
| ग:८ | E:8 | निर्वाहण ( Manipulation ) |
| ग१ | E1 | अप्रांगार रसायन; निरिन्द्रिय रसायन ( Inorganic chemistry ) |
| ग२ | E2 | भस्मजनक माणिल ( Basic Oxide ); उत्प्राणिल ( Hydroxyl ) |
| ग३ | E3 | अम्ल; आम्ल ( Acid ) |
| ग४ | E4 | लवण ( Salt ) |
| ग५ | E5 | प्रांगार रसायन; सेंद्रिय रसायन ( Organic chemistry ) |
| ग६८ | E68 | प्रांगोदीय ( Carbohydrate ) |
| ग६८९२ | E6892 | माड; पिष्टसत्व ( Starch ) |
| ग६८९४ | E6894 | पेशीद्रव्य ( Cellulose ) |
| ग७ | E7 | सुरभिद्रव्य ( Aromatic compound ) |
| ग९ | E9 | देहतत्त्व ( Biosubstance ) |
| ग९२ | E92 | क्षारोद ( Alkaloid ) |
| ग९२ह | E92Z | प्रोटीन; अन्नसार ( Protein ) |
| ग९४ | E94 | चर्बी ( Fat ) |
| ग९५ | E95 | रंगद्रव्य ( Pigment ) |
| ग९७ | E97 | जीवतत्त्व ( Vitamin ) |
| ग९८२ | E982 | फेनकद्रव्य ( Enzyme ) |
| ग९८६ | E986 | न्यासर्ग ( Hormone ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| | | **घ रसायनकला** |
| | | F Chemical technology |
| घ१८२ | F182 | लोह ( Iron ) |
| घ१९१ | F191 | धातुकला ( Metallurgy ) |
| घ४४१६ | F4416 | कांचमिना ( Enamel ) |
| घ५२७ | F527 | लाकडाचा रांधा; रांध्याचा हस्तिदंत कचकडी ( Celluloid ) |
| घ५३ | F53 | अन्न; खाद्य ( Food ) |
| घ५४ | F54 | मद्यार्क ( Alcohol ) |
| घ५४७ | F547 | मदिरा ( Wine ) |
| घ५४८ | F548 | यवसुरा; सातूची दारू ( Beer ) |
| घ५५ | F55 | इन्धन; पेटवण ( Fuel ) |
| घ५५१ | F551 | कोळसा ( Coal ) |
| घ५५५ | F555 | मृतैल; अशुद्ध राकेल (Petroleum) |
| घ५५५२ | F5552 | राकेल ( Petrol ) |
| घ५५९१ | F5591 | आगकाड्या ( Matches ) |
| घ५५९४ | F5594 | उत्स्फोटक ( Explosive ) |
| घ५६ | F56 | औषध, भेषज ( Drug ) |
| घ५७३ | F573 | कृत्रिम रेशीम (Artificial silk) |
| घ५८ | F58 | रंग ( Dye ) |
| घ५८९५ | F5895 | रंगलेप ( Paint ) |
| घ५९४ | F594 | विष ( Poison ) |
| घ९४९१ | F9491 | मेणबत्ती ( Candle ) |
| घ९४९६ | F9496 | साबण ( Soap ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| | | च जीवशास्त्र<br>G Biology |
| च:१९ | G:19 | सूक्ष्मदर्शन विद्या; अणुवीक्षण यंत्र-विद्या ( Microscopy ) |
| च:२ | G:2 | अंगविज्ञान ( Morphology ) |
| च:३ | G:3 | इन्द्रियविज्ञान ( Physiology ) |
| च:३३ | G:33 | चयापचय; जीवनक्रिया ( Metabolism ) |
| च:३४६ | G:346 | उपवास ( Fasting ) |
| च:३९४ | G:394 | थकवा ( Fatigue ) |
| च:५ | G:5 | परिस्थितिशास्त्र; मूलस्थान विचार-विज्ञान ( Ecology ) |
| च:५६३ | G:563 | परजीवन; परोपजीवन ( Parasitism ) |
| च:५८ | G:58 | देशान्तरगमन ( Migration ) |
| च:६ | G:6 | जनन; अनुवंशशास्त्र (Genetics; Phylogeny ) |
| च:६१ | G:61 | पैत्रिकता; अनुवंशिकता ( Heredity ) |
| च:६११ | G:611 | सुजननविद्या ( Eugenics ) |
| च:६४ | G:64 | विशिष्टोत्पादन ( Breeding ) |
| च:६४१ | G:641 | प्रसंकरण ( Hybridisation ) |
| च:६६ | G:66 | विकास ( Evolution ) |
| च:६७ | G:67 | प्रजनन ( Reproductive methods ) |
| च:७ | G:7 | व्यक्तिचरित ( Ontogeny ) |
| च१ | G1 | जीवन ( Life ) |
| च११ | G11 | पेशी ( Cell ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| च११६ | G116 | वंश ( Gene ) |
| च१२ | G12 | पेशीजाल ( Tissue ) |

### छ भूगर्भशास्त्र

### H Geology

| | | |
|---|---|---|
| छ१ | H1 | खनिजशास्त्र ( Minerology ) |
| छ१:८ | H1:8 | स्फटिकशास्त्र(Crystallography) |
| छ१९ | H19 | रत्न ( Precious stone ) |
| छ२ | H2 | प्रस्तरशास्त्र ( Petrology ) |
| छ३ | H3 | रचनात्मक भूगर्भशास्त्र ( Structural Geology ) |
| छ३६ | H36 | पर्वत निर्माण ( Mountain formation ) |
| छ४ | H4 | गत्यात्मक भूगर्भशास्त्र ( Dynamic Geology ) |
| छ४११ | H411 | ज्वालामुखी ( Volcano ) |
| छ४१३२ | H4132 | भूकम्प ( Earthquake ) |
| छ६ | H6 | उत्खातजीवनशास्त्र ( Palaeontology ) |
| छ७ | H7 | आर्थिक भूगर्भशास्त्र ( Economic Geology ) |
| छ७:१५ | H7:15 | ( मौल्यवान् ) धातूंच्या खाणी शोधून काढणें ( Prospecting ) |
| छ७:१५५ | H7:155 | प्राप्तिस्थान ( Occurrence ) |
| छ७:१६ | H7:16 | उत्पत्ति ( Genesis ) |

### छा खाणींतील बांधकाम

### ? Mining engineering

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| | | ज वनस्पतिशास्त्र<br>I Botany |
| ज:१२ | I:12 | वनस्पतिकुल; वनस्पतिवर्णन (Flora) वनस्पतींचा नैसर्गिक इतिहास (Natural history of plants) |
| ज:१२·२ | I:12·2 | भारतांतील वनस्पती (Indian Flora) |
| ज:१३ | I:13 | वनस्पतींचें सुलभ वर्णन (Popular description of plants) |
| ज:१८ | I:18 | वनस्पतींची तालिका (List of plants) |
| ज:२ | I:2 | वनस्पतींचें शरीरविज्ञान (Morphology of plants) |
| ज:३ | I:3 | वनस्पतींचें इन्द्रियविज्ञान Physiology of plants) |
| ज:५ | I:5 | वनस्पतींचें परिस्थितिविज्ञान; वनस्पति मूलस्थान विज्ञान (Plant ecology) |
| ज:६ | I:6 | वनस्पतींचें अनुवंशशास्त्र (Plaut genitics) |
| ज:६७ | I:67 | वनस्पतींचें प्रजनन (Reproduction of plants) |
| ज:७३ | I:73 | भ्रोणिकी; पिंडवृद्धिशास्त्र (Embryology) |
| ज१ | I1 | अपुष्प वनस्पति; अबीज वनस्पति (Cryptogamia) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नाव |
|---|---|---|
| ज२ | I2 | स्थाणु वनस्पति ( Thallophyta ) |
| ज२२ | I22 | शैवाळ, जलशेवाळ, पाणकेस ( Algae, sea weeds ) |
| ज२३ | I23 | छत्राङ्कुर, छत्रक ( Fungi ) |
| ज२३७५ | I2375 | भूछत्र ( Mushroom ) |
| ज३ | I3 | शैवाल वनस्पति ( Bryophyta ) |
| ज३२ | I32 | शेवाळें ( Musci, Moss ) |
| ज४ | I4 | पर्णांगोद्भिद् वनस्पति ( Pteridophyte ) |
| ज५ | I5 | फुलझाडें (Flowering plants) |
| ज६ | I6 | निवृतबीज वनस्पति ( Gymnosperm ) |
| ज७ | I7 | एकदल वनस्पति ( Monocotiledon ) |
| ज८ | I8 | द्विदल वनस्पति ( Dicotyledon ) |

## झ कृषिविद्या
## J Agriculture

| | | |
|---|---|---|
| झ.१ | J:1 | मृत्तिका ( Soil ) |
| झ.१:११ | J:1:11 | जमीन लागवडीस आणणें, उद्धरण ( Reclamation ) |
| झ:१:२१ | J:1:21 | नांगरणी ( Ploughing ) |
| झ १:२४ | J:1:24 | जमीन सपाट करणें (Levelling) |
| झ:१:२८ | J:1:28 | तलाव बांधणें, बंधारण (Bunding) जलपृष्ठरेषा बंधारण ( Contour bunding ) |
| झ.२ | J:2 | खत ( Manure ) |
| झ:२:१ | J:2:1 | खताचें वर्गीकरण ( Classification of manure ) |

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| झ:२:२ | J:2:2 | खत गोळा करणें (Manure gathering) |
| झ:२:२७ | J:2:27 | खाद; मिश्रखाद (Composting) |
| झ:२:३ | J:2:3 | खताची मतवारी (Grading of manure) |
| झ:२:७ | J:2:7 | खताचें आरोपण (Application of manure) |
| झ:२:८ | J:2:8 | खताचें सांठवण (Storing of manure) |
| झ:२२ | J:२२ | शेणखत(Farmyard manure) |
| झ:२२:८ | J:22:8 | शेणखत सांठवण (Storing of farmyard manure) |
| झ:२३ | J:23 | गांवांतील केरकचरा (Municipal refuse) |
| झ:२४ | J:24 | रासायनिक खत (Chemical manure) |
| झ:२४११ | J:2411 | नत्रयुक्त खत (Nitrogenous manure) |
| झ:२४११:७ | J:2411:7 | नत्रयुक्त खताचें आरोपण (Applying of nitrogenous manure) |
| झ:२४१२ | J:2412 | स्फुरयुक्त खत (Phosphatic manure) |
| झ:२४१३ | J:2413 | पालाशयुक्त खत (Potassic manure) |
| झ:२४५१ | J:2451 | वनस्पति खत (Green manure) |
| झ:२४५१:१ | J:2451:1 | वनस्पति खताचें वर्गीकरण (Classification of green manure) |

## कालक्रम युक्ति (Chronological Device)

कालक्रम अंकाचे साहाय्यानें काहीं वर्गांचे विभाग व उपविभाग करणें सोयीचें असल्यामुळें ह्या युक्तीची योजना ह्या पद्धतींत केलेली आहे ह्या युक्तीकरिता कालदर्शक विभागाच्या तक्त्याचा उपयोग केला आहे.

उदाहरणे—

(१) कोणत्याहि भाषेंतील व कोणत्याहि वाङ्मयप्रकाराच्या ग्रंथकाराना ह्या युक्तीनें स्वतंत्र वर्गांक तयार करता येतात व ह्या योजनेमुळें असे वर्गांक आपणास कितीहि निर्माण करावे लागले तरी ते तसे निर्माण करता येतात

आपणास मराठी वाङमयाच्या ग्रंथकाराना पुढीलप्रमाणें ग्रंथांक तयार करता येतात —

द१५५,१ट१० मुक्तेश्वर
द१५५,१ट१५ वामन पंडित
द१५५,१ड२९ मोरोपंत
द१५५,१ढ८५ गोविंदाग्रज
द१५५,१ढ९२ गिरीश

वरील वर्गांकापैकीं द१५५,१ट१० ह्या वर्गांकाची फोड पुढीलप्रमाणें करता येते —

द = ललितवाङ्मय
द१५५ = मराठी ललितवाङ्मय (१५५ मराठी भाषा)
द१५५,१ = मराठी काव्य
द१५५,१ट१० = इ स १६१० मध्यें जन्मलेले मराठी कवी म्हणजेच मुक्तेश्वर

(२) कालक्रम युक्तीनें कृत्रिम भाषांचे स्वतंत्र वर्गांक तयार करता येतात. जसें —

न९९ढ१७ सोलरेसोल (Solresol) (इ स १८१७ मध्यें संशोधिलेली कृत्रिम भाषा)
न९९ढ८७ एस्पेरांतो (Esperanto) (इ स १८८७ मध्यें संशोधिलेली कृत्रिम भाषा)

वरील वर्गांकापैकीं न९९ढ१७ ह्या वर्गांकाची फोड पुढीलप्रमाणें करता येते.—

न = भाषाशास्त्र
न९९ = कृत्रिम भाषा
न९९ढ१७ = इ. स १८१७ मध्यें सशोधिलेली कृत्रिम भाषा म्हणजेच सोलरेसोल ही भाषा

(२) श अर्थशास्त्र ह्या वर्गातील श:३ वितरण अथवा वाटणी ह्या विभागाचा पुढील उपविभाग कालक्रम युक्तीनें केलेला आहे.—

श.३ढ समाजवाद (Socialism)

वरील वर्गांकात ढ हें चिन्ह एकोणिसाव्या शतकाचें द्योतक आहे. हें चिन्ह वर्गांकाला जोडण्याचें कारण 'समाजवाद' आठराव्या शतकात निर्माण झाला

कालक्रम युक्तीचीं वर काहीं उदाहरणें दिलीं आहेत त्यावरून ह्या युक्तीमुळें विवक्षित विषयाना स्वतन्त्र वर्गांक देणें अगदीं सहजशक्य होते व अशा विषयाच्या गटातील निरनिराळे विषयांचे वर्गांक लक्षात ठेवणें सहज शक्य होते. ह्या युक्तीचा उपयोग ह्या पद्धतींत बऱ्याच ठिकाणीं केला आहे.

## विषय युक्ति (Subject Device)

कित्येक वर्गांचे उपविभाग विषययुक्तीनें केल्यानें ते स्मृतिसुलभ होतात व त्याची रचना सुद्धा सोयीची होते. विषय युक्ति योजणें म्हणजे निरनिराळ्या वर्गांना व त्याच्या उपविभागाना जे वर्गांक दिलेले आहेत ते वर्गांक दुसऱ्या सबधित वर्गांना अथवा त्याच्या उपविभागाना त्याचे कारणपरत्वें त्याचे उपविभाग म्हणून कसात जोडावयाचे ह्या योजनेमुळें वारंवार जे नवीन नवीन विषय निर्माण होतात त्याना सहजरीतीनें स्वतन्त्र वर्गांक तयार करता येतात व त्याच्या रचनेमध्यें एकप्रकारची सुसूत्रता निर्माण होते, व कारणपरत्वें असे कितीहि वर्गांक तयार करावे लागले तरी तसे ते निर्माण करणें सहज शक्य होतें.

ह्या युक्तीचीं काहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत —

ख६,९(ढ१४) छापण्याचीं यन्त्रें (Printing machinery)
ख६,९(ढश३८) पिठाच्या गिरणीचीं यन्त्रें (Flouring machinery)

ढ(ऊ१) गणनायंत्र ( Calculating machine )
फ४३(व) राजनीति ( State Ethics )
श१(झ) कृषिअर्थशास्त्र ( Agricultural Economics )

वरील वर्गांकांपैकीं ख६,९(ढ१४) ह्या वर्गांकांची फोड पुढीलप्रमाणें करतां येते.

ख = स्थापत्य
ख६ = यंत्रस्थापत्य
ख६,९ = इतर यंत्रें
ख६,९(ढ१४)=छापण्याचीं यंत्रें

वरील वर्गांकांत ढ१४ हा वर्गांक ढ उपयुक्त कला ह्या वर्गाचा एक विभाग आहे व तो 'छापण्याची कला' ह्या विषयाला ठरविलेला आहे. तो ख६,९ ह्या वर्गांकाचे पुढें कंसांत विषय युक्तीनें जोडल्यामुळें सबंध वर्गांकाचा अर्थ छापण्याचीं यंत्रें असा होतो.

वरीलप्रमाणें इतर वर्गांकांची फोड करतां येते. ह्या युक्तीचा उपयोग आपणांस अनेकवेळां करण्याची आवश्यकता असते व तो करण्याची पद्धत समजल्यामुळें नवीन नवीन निर्माण होणाऱ्या विषयांना स्वतंत्र वर्गांक तयार करणें सहज शक्य होतें.

## प्राधान्य युक्ति
## ( Favoured Category Device )

लोकांच्या आवडीच्या विषयांना प्राधान्य देण्यासाठीं ह्या पद्धतींत प्राधान्य युक्तीचा उपयोग करण्यांत येतो. ह्या युक्तींत निरनिराळ्या प्रकारच्या विषयांतून ८, १६ अथवा जास्तींत जास्त ६४ विषयांची निवड करून त्यांच्या प्रसिद्धीच्या क्रमानें ते प्रथम लावावयाचे असतात व त्यांचे आठ आठांचे गट पाडून त्यांना क्रमानें वर्गांक द्यावयाचे असतात. असे गट पुढीलप्रमाणें तयार करण्यांत येतात. १,२…७,८, ९१,९२…९७,९८ अथवा ११,१२…१७,१८, २१, २२…२७,२८…८१…८८

ह्या युक्तीचा उपयोग बऱ्याच वर्गांत कारणपरत्वें केलेला आहे. ह्या युक्ती-

वरील वर्गांकांपैकीं न९९ढ१७ ह्या वर्गांकाची फोड पुढीलप्रमाणें करतां येते.—

न = भाषाशास्त्र
न९९ = कृत्रिम भाषा
न९९ढ१७ = इ. स. १८१७ मध्यें संशोधिलेली कृत्रिम भाषा म्हणजेच सोलरेसोल ही भाषा.

( २ ) श अर्थशास्त्र ह्या वर्गातील श:२ वितरण अथवा वाटणी ह्या विभागाचा पुढील उपविभाग कालक्रम युक्तीनें केलेला आहे.—

श:२ढ समाजवाद ( Socialism )

वरील वर्गांकांत ढ हें चिन्ह एकोणिसाव्या शतकाचें द्योतक आहे. हें चिन्ह वर्गांकाला जोडण्याचें कारण ' समाजवाद ' आठराव्या शतकांत निर्माण झाला.

कालक्रम युक्तीचीं वर कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांवरून ह्या युक्तीमुळें विवक्षित विषयांना स्वतंत्र वर्गांक देणें अगदीं सहजशक्य होते व अशा विषयांच्या गटांतील निरनिराळे विषयांचे वर्गांक लक्षांत ठेवणें सहज शक्य होते. ह्या युक्तीचा उपयोग ह्या पद्धतींत बऱ्याच ठिकाणीं केला आहे.

## विषय युक्ति ( Subject Device )

कित्येक वर्गाचे उपविभाग विषययुक्तीनें केल्यानें ते स्मृतिसुलभ होतात व त्यांची रचना सुद्धां सोपीची होते. विषय युक्ति योजणें म्हणजे निरनिराळ्या वर्गांना व त्यांच्या उपविभागांना जे वर्गांक दिलेले आहेत ते वर्गांक दुसऱ्या संबंधित वर्गांना अथवा त्यांच्या उपविभागांना त्यांचे कारणपरत्वें त्यांचे उपविभाग म्हणून कंसांत जोडावयाचे. ह्या योजनेमुळें वारंवार जे नवीन नवीन विषय निर्माण होतात त्यांना सहजरीतीनें स्वतंत्र वर्गांक तयार करतां येतात व त्यांच्या रचनेमध्यें एकप्रकारची सुसूत्रता निर्माण होते; व कारणपरत्वें असे कितीहि वर्गांक तयार करावे लागले तरी तसें ते निर्माण करणें सहज शक्य होतें.

ह्या युक्तीचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.—

स६,९(ढ१४) छापण्याचीं यंत्रें ( Printing machinery )
स६,९(ढस२८) पिठाच्या गिरणीचीं यंत्रें ( Flouring machinery )

द(ऊ१) गणनायंत्र ( Calculating machine )
फ४३(व) राजनीति ( State Ethics )
श१(क्ष) कृषिअर्थशास्त्र ( Agricultural Economics )

वरील वर्गांकांपैकीं ख६,९(ढ१४) ह्या वर्गांकांची फोड पुढीलप्रमाणें करतां येते.

ख = स्थापत्य
ख६ = यंत्रस्थापत्य
ख६,९ = इतर यंत्रें
ख६,९(ढ१४)=छापण्याचीं यंत्रें

वरील वर्गांकांत ढ१४ हा वर्गांक ढ उपयुक्त कला ह्या वर्गाचा एक विभाग आहे व तो 'छापण्याची कला' ह्या विषयाला ठरविलेला आहे. तो ख६,९ ह्या वर्गांकाचे पुढें कंसांत विषय युक्तीनें जोडल्यामुळें सर्वंध वर्गांकाचा अर्थ छापण्याचीं यंत्रें असा होतो.

वरीलप्रमाणें इतर वर्गांकांची फोड करतां येते. ह्या युक्तींचा उपयोग आपणास अनेकवेळां करण्याची आवश्यकता असते व ती करण्याची पद्धत समजल्यामुळें नवीन नवीन निर्माण होणाऱ्या विषयांना स्वतंत्र वर्गांक तयार करणें सहज शक्य होते.

## प्राधान्य युक्ति
## ( Favoured Category Device )

लोकांच्या आवडीच्या विषयांना प्राधान्य देण्यासाठीं ह्या पद्धतींत प्राधान्य युक्तीचा उपयोग करण्यात येतो. ह्या युक्तींत निरनिराळ्या प्रकारच्या विषयांतून ८, १६ अथवा जास्तींत जास्त ६४ विषयांची निवड करून त्यांच्या प्रसिद्धीच्या क्रमानें ते प्रथम लावावयाचे असतात व त्यांचे आठ आठांचे गट पाडून त्यांना क्रमानें वर्गांक द्यावयाचे असतात. असे गट पुढीलप्रमाणें तयार करण्यात येतात. १,२⋯७,८, ९१,९२⋯९७,९८ अथवा ११,१२⋯१७,१८, २१, २२⋯२७,२८⋯८१⋯८८

ह्या युक्तीचा उपयोग बऱ्याच वर्गांत कारणपरत्वें केलेला आहे. ह्या युक्ती-

वरील वर्गांकापैकीं न९९ढ१७ ह्या वर्गांकाची फोड पुढीलप्रमाणें करता येते —

न = भाषाशास्त्र
न९९ = कृत्रिम भाषा
न९९ढ१७ = इ स १८१७ मध्यें संशोधिलेली कृत्रिम भाषा म्हणजेच सोलेरेसोल ही भाषा

(२) श अर्थशास्त्र ह्या वर्गातील श ३ वितरण अथवा वाटणी ह्या विभागाचा पुढील उपविभाग कालक्रम युक्तीनें केलेला आहे —

श ३ढ समाजवाद (Socialism)

वर्गांकाचा अर्थ चीनमधील धर्म, ह्या वर्गांकांत ४१ हे अंक चीनदर्शक भूभाग युक्तीनें प ह्या वर्गांकाला जोडले आहेत. त्याचेनतर १,२,३ असे जे क्रमानें अक दिले आहेत ते प्राधान्य युक्तीचे अंक आहेत. ते चीनमधील तीन धर्मांचे त्यांच्या महत्त्वाचे क्रमानें दिले आहेत.

## स्मृतिसाहाय्यक युक्ति

## (Mnemonic Device)

वर्गांचे विभाग व उपविभाग जेव्हां अंकांनीं करण्यांत येतात तेव्हां त्या अंकांची योजना प्रत्येक अंकाला कांहीं ठराविक प्रकारचे अर्थबोधांचीं लक्षणें योजून करण्यात येते. ही जी वर्गाचे उपविभाग करण्याची युक्ति तिला स्मृतिसाहाय्यक युक्ति ही संज्ञा दिली आहे. ह्या स्मृतिसाधनाना कोष्टकरहित स्मृतिसाधनें) (Unscheduled Mnemonics or Nonscheduled Mnemonics) अथवा बीजमूलक (Seminal) स्मृतिसाधनें अशी सज्ञा दिली आहे; कारण त्यांचीं कोष्टकें जरी तयार केलेलीं नसलीं; तरी त्यांना जे निरनिराळे रूढीनिष्ट (Conventional) अर्थ ठरविलेले आहेत त्या अर्थानें ते वापरले जातात.

उदाहरणार्थ—

१ हा अंक, एकता (Unity); परमेश्वर (God); जग (world); उत्क्रांतिक्रमांतील अथवा कालक्रम, स्थलक्रम यांतील पहिला (the first in evolution or time or special order), एकसीमा अथवा एक रेषा; (one dimension or line); घनस्थिति (solid state) आणि वरील लाक्षण्यसदृश विद्यमान (existential) व काल्पनिक (conceptual) वस्तूंना (entities) स्मृतिसाधन म्हणून वापरण्यांत येतो.

जसें—

परमेश्वर (God)

प:३१ परमेश्वर

मुळें बोधचिन्हांत बचत होते व विशेष आवडीच्या विषयांना प्राधान्य मिळाल्यामुळें अशा विषयांची रचना एकंदरीनें स्मृतिसुलभ व सोयीची होते.

ह्या युक्तीचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.--

( १ ) ' झ ' कृपिशास्त्र ह्या मुख्य वर्गातील झ३८ हा विभाग ' खाद्य धान्य ' ( Cereals ) ह्या विषयाचा वर्गांक आहे ह्या विभागाच्या पोटविभागांत निर्दिष्ट केलेलीं धान्यें मुख्यत्वें मनुष्याचीं खाद्य धान्यें आहेत; म्हणून त्याचे वर्गांक प्राधान्य युक्तीचे साहाय्यानें मनुष्याच्या आवडीच्या क्रमानें ठरविले आहेत. त्याचे क्रम व त्यांना दिलेले वर्गांक पुढें दाखविले आहेत.—

| | |
|---|---|
| झ३८१ भात ( Rice ) | झ३८५ मका ( Maize ) |
| झ३८२ गहूं ( Wheat ) | झ३८६ जव-सातु ( Barley ) |
| झ३८३ ओट ( Oats ) | झ३८७ ज्वारी, बाजरी ( Millet ) |
| झ३८४ राय ( Rye ) | क्ष३८८ इतर खाद्य धान्यें ( other Cereals ) |

वरील गटांत भात हें मनुष्याचें सर्वांत जास्त आवडतें धान्य धरलें आहे व त्याचे खालोखाल गहूं ह्या धान्याचा क्रम ठरविला आहे व त्यानंतर क्रमानें इतर कमी कमी आवडीच्या धान्यांना वर्गांक दिले आहेत.

(२) 'प' धर्म ह्या वर्गाचा प८ इतर धर्म ह्या विभागाचे उपविभाग भूभाग युक्तीचे साहाय्यानें केल्यानंतर प्राधान्य युक्तीचे साहाय्यानें केले आहेत. जसें.---

प८४११ पूर्व कन्फ्यूशियन ( Pre confucianism )
प८४१२ कन्फ्यूशियन ( Confucianism )
प८४१३ लाओत्सी ( Lao-Tseism )
प८४२१ शिंटो ( Shintoism )
प८४४१ शीख ( Sikhism )
प८४५१ झोराष्ट्र ( Zoroastrianism )
प८४५२ मनीची ( Manichaeism )

वरील वर्गांकांत पहिले तीन धर्म चीनमधील आहेत; व त्यांच्या महत्वाच्या क्रमानें प्राधान्य युक्तीचे साहाय्यानें त्यांना वर्गांक दिले आहेत. प८४१ हा

वर्गांकाचा अर्थ चीनमधील धर्म, ह्या वर्गांकांत ४१ हे अंक चीनदर्शक भूभाग युक्तीनें प ह्या वर्गांकाला जोडले आहेत. त्यांचेनंतर १,२,३ असे जे क्रमानें अंक दिले आहेत ते प्राधान्य युक्तीचे अंक आहेत. ते चीनमधील तीन धर्मांचे त्यांच्या महत्त्वाचे क्रमानें दिले आहेत.

## स्मृतिसाहाय्यक युक्ति
## ( Mnemonic Device )

वर्गांचे विभाग व उपविभाग जेव्हां अंकांनीं करण्यांत येतात तेव्हां त्या अंकांची योजना प्रत्येक अंकाला कांहीं ठराविक प्रकारचे अर्थबोधांचीं लक्षणें योजून करण्यांत येते. ही जी वर्गांचे उपविभाग करण्याची युक्ति तिला स्मृति-साहाय्यक युक्ति ही संज्ञा दिली आहे. ह्या स्मृतिसाधनांना कोष्टकरहित स्मृति-साधनें ) ( Unscheduled Mnemonics or Nonscheduled Mnemonics ) अथवा बीजमूलक ( Seminal ) स्मृतिसाधनें अशी संज्ञा दिली आहे; कारण त्यांचीं कोष्टकें जरी तयार केलेलीं नसलीं; तरी त्यांना जे निरनिराळे रूढीनिष्ट ( Conventional ) अर्थ ठरविलेले आहेत त्या अर्थानें ते वापरले जातात.

उदाहरणार्थ—

१ हा अंक, एकता ( Unity ); परमेश्वर ( God ); जग ( world ); उत्क्रांतिक्रमांतील अथवा कालक्रम, स्थलक्रम यांतील पहिला ( the first in evolution or time or special order ); एकसीमा अथवा एक रेषा; ( one dimension or line ); घनस्थिति ( solid state ) आणि यांतील लाक्षण्यसदृश नियमान ( existential ) व काल्पनिक ( conceptual ) वस्तूंना ( entities ) स्मृतिसाधन म्हणून वापरण्यांत येतो.

जसें—

परमेश्वर ( God )

प:३१ परमेश्वर

वरील वर्गाची फोड पुढीलप्रमाणें.--

प धर्म

: ऊर्जा विभागाचें चिन्ह

३ ऐश्वर्य;

धर्मशास्त्र ( theology )

१ परमेश्वर ( God )

जग ( World )

२११ जगाचें ग्रंथालय

वरील वर्गाकाची फोड पुढीलप्रमाणें—

२ ग्रथालयशास्त्र

१ स्थानातीत ग्रथालय ( Translocal library )

१ जगाचें ग्रथालय ( World library )

भूभाग विभागातील जग ह्या भूभागाला १ हा अंक ठरविला आहे

उत्क्रांतिक्रमांतील पहिला

ज१ अपुष्प वनस्पती ( Cryptogamia )

ट१ अपृष्ठवशीप्राणि ( Invertebrata )

न,१ पृथक्कृतध्वनी ( Isolated Sound )

भ१ बालमानस ( Child Psychology )

म१ बालशिक्षण ( Child Education )

प१ अराजकता ( Anarchy )

स११ बालसमाजशास्त्र ( Caild Sociology )

एक सीमा अथवा एक रेषा

ऊ६१ एक सीमा भूमिति ( Geo netry of one dimension )

घनस्थिति

ऊ७१ घनद्रव्यें ( solids )

२ हा अंक दोन सीमा ( two dimensions ), समतल, पातळी; सपाटी, बाजू, पैलू ( plane ), शङ्कुच्छेद ( conics ), आकार, प्रकार

( form ) अथवा रचना, व्यवस्था ( structure ); शरीरच्छेदन ( anatomy ); अंगविज्ञान, आकारविज्ञान ( morphology ), ज्ञान उगम ( sources of knowledge ); भूप्रकृतिवर्णन विद्या (physiography); घटना ( constitution ); भौतिक मानुष्यकशास्त्र (physical anthropology ) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तूंना स्मृतिसाधन म्हणून वापरण्यांत येतो

जसें--

समतल ( plane ); दोन सीमा ( two dunensions ).

ऊ५२ रेखात्रिकोण मिति ( Trigonometry of tno dimensions; Plane Trigonometry )

ऊ६२ रेखाभूमिति ( Geometry of two dunensions; Plane Geometry )

प्रकार ( Form )

संगीताचा प्रकार ( Form of music )

थफ,२

रचना ( Structure )

न१५५,२१:२ मराठी नामाची रचना

श५२ व्यापार-रचनेप्रमाणें ( Commerce-by structure )

अंगविज्ञान ( Anatomy; Morphology )

च:२ जीवांचें अंगविज्ञान

ज:२ वनस्पतींचें ,,

ट:२ प्राण्याचें ,,

ड:२ मनुष्याचें ,,

भूप्रकृति ( Physiography )

१२ भूप्रकृति

४ हा अंक उष्णता ( heat ); निदानशास्त्र ( pathology ); रोग ( disease ); वाहतुक ( transport ); आंतरजुळणी, संयोगीकरण ( inter-linking ); भेसळ, संकीर्ण, संकरज ( hybrid ); क्षार ( salt ) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तूंना स्मृति-साधन म्हणून वापरण्यांत येतो.

जसें—

रोगनिदान ( Pathology ); रोग ( Disease )

| | | |
|---|---|---|
| च:४ | जीवांचे रोग | G:4 |
| ज:४ | वनस्पतींचे रोग | I:4 |
| झ:४ | कृषि वनस्पतींचे रोग | J:4 |
| ट:४ | प्राण्यांचे रोग | K:4 |
| ठ:४ | पाळीव प्राण्यांचे रोग | λ:4 |
| ड:४ | मनुष्यांचे रोग | L:4 |
| भ:२:४ | संवेदना निदान ( Pathology of sensation ) | S:2·4 |
| भ:३:४ | देहभानाच्या लाक्षण्याचें निदान ( Pathology of the characters of consciousness ) | S:3:4 |
| स:४ | समाज निदान ( Social Pathology ) | Y:4 |

वाहतूक ( Transport )

| | | |
|---|---|---|
| ख४ | वाहतूक स्थापत्य (Transport Engineering) | D4 |
| ख६६,४ | विद्युत् वाहतूक ( Transport of Electricity ) | D66,4 |
| श४ | वाहतूक अर्थशास्त्र (Transport Economics) | X4 |
| श:४ | वाहतूक रीति ( Process of Transport ) | X:4 |

संकरज ( Hybrid )

| | | |
|---|---|---|
| स५९४ | सम्मिश्रजात; संकरजात ( Hybrid ) | Y594 |

क्षार ( Salt )

| | | |
|---|---|---|
| ग:४ | क्षार ( रसायन ) | E:4 |

घटना ( Constitution )

लर:२ भारताची राज्यघटना

व.२ राज्यघटनाशास्त्र

३ हा अंक तीन सीमा ( three dimensions ) अथवा स्थल (space), घनाकार वस्तू (cubics), पृथ:करण (analysis) अथवा कार्य फल (function), इंद्रियविज्ञान (physiology), वाक्यरचना (syntax) पद्धति (method), सामाजिक मानुष्यकशास्त्र (social anthropology) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश्य विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तूंना स्मृतिसाधनें म्हणून वापरण्यात येतो.

जसें—

तीनसीमा ( Three dimensions )

| | |
|---|---|
| ऊ६३ | तीन सीमा भूमिति (geometry of three dimensions) |

घन ( Cubics )

| | |
|---|---|
| ऊ६३३ | घन भूमिति ( Solid geometry ) |

इंद्रिय विज्ञान ( *Physiology* )

| | |
|---|---|
| च.३ | जीनाचें इंद्रिय विज्ञान |
| ज ३ | वनस्पतींचें इंद्रिय विज्ञान |
| ट:३ | प्राण्याचें इंद्रिय विज्ञान |
| ड ३ | मनुष्याचें ,, ,, |

वाक्यरचना ( Syntax )

न१५५,३:३ मराठी वाक्यरचना

वरील वर्गांकाची फोड पुढीलप्रमाणें —

न१५५ = मराठी भाषा

न१५५,३ = मराठी शब्द

न१५५,३:३ = मराठी वाक्यरचना

४ हा अंक उष्णता ( heat ), निदानशास्त्र (pathology ), रोग (disease), वाहतुक (transport ), आंतरजुळणी, संयोगीकरण (inter-linking ), भेसळ, संकीर्ण, संकरज ( hybrid ), क्षार ( salt ) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तूंना स्मृति-साधन म्हणून वापरण्यात येतो

जसें—

रोगनिदान ( Pathology ), रोग ( Disease )

| | | |
|---|---|---|
| च.४ | जीवांचे रोग | G:4 |
| ज ४ | वनस्पतींचे रोग | I 4 |
| झ ४ | कृषि वनस्पतींचे रोग | J.4 |
| ट ४ | प्राण्यांचे रोग | K.4 |
| ठ.४ | पाळीव प्राण्यांचे रोग | λ 4 |
| ड ४ | मनुष्यांचे रोग | L·4 |
| भ २ ४ | संवेदना निदान ( Pathology of sensation ) | S·2 4 |
| भ ३.४ | देहभानाच्या लाक्षण्यांचें निदान ( Pathology of the characters of consciousness ) | S.3.4 |
| स ४ | समाज निदान ( Social Pathology ) | Y:4 |

वाहतूक ( Transport )

| | | |
|---|---|---|
| ख४ | वाहतूक स्थापत्य (Transport Engineering) | D4 |
| ख६६,४ | विद्युत् वाहतूक ( Transport of Electricity ) | D66,4 |
| श४ | वाहतूक अर्थशास्त्र (Transport Economics) | X4 |
| श'४ | वाहतूक रीति ( Process of Transport ) | X:4 |

संकरज ( Hybrid )

| | | |
|---|---|---|
| स५९४ | सम्मिश्रजात, संकरजात ( Hybrid ) | Y594 |

क्षार ( Salt )

| | | |
|---|---|---|
| ग.४ | क्षार ( रसायन ) | E:4 |

५ हा अंक ऊर्जा ( energy ); प्रकाश ( light ); किरणविसर्जन ( radiation ), सेन्द्रिय ( organic ); द्रव ( liquid ); जल ( water ); महासागर (ocean); परदेश (foreign lands), परदेशीय (aliens); बाह्य ( external ); परिस्थिति, आवरण उपाधि (environment); परिस्थितिशास्त्र ( ecology ); लोकनियंत्रित योजना ( public controlled plan ); मनोविकार, क्षोभ, उद्वेग ( emotion ); पालवी, पल्लव ( foliage ), सौंदर्यविज्ञान, सृष्टिसौंदर्य, रसज्ञान, रुचिशास्त्र ( Aesthetic ), महिला, स्त्री, ( woman ), जाति, लिंग, स्त्रीपुरुषचिन्ह ( sex ); गुन्हा, अपराध, दोष (crime) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तुंना स्मृतिसाधन म्हणून वापरण्यात येतो.

जसें—

प्रकाश ( Light )

| | | |
|---|---|---|
| क५ | प्रकाश वस्तुशास्त्र ( Physics of light ) | C5 |

प्रसरण ( Radiation )

| | | |
|---|---|---|
| क४:१५ | उष्णता प्रसरण | C4:15 |

सेन्द्रिय ( Organic )

| | | |
|---|---|---|
| ग५ | सेंद्रिय रसायन ( organic chemistry ) | E5 |
| झ:१३५ | सेन्द्रिय जमीन ( Organic soil ) | J:135 |

द्रव ( Liquid )

| | | |
|---|---|---|
| ऊ७५ | द्रवयामिक ( Mechanics of liquid ) | B75 |
| क२५ | द्रववस्तुशास्त्र ( Physics of liquids ) | C25 |
| ग:२२५ | रासायनिक द्रावण ( Chemical liquid solution ) | E:225 |

महासागर ( Ocean )

| | | |
|---|---|---|
| ख४२५ | सागरवाहतूकस्थापत्य ( Ocean transport engineering ) | D425 |
| श४२५ | सागरवाहतूक अर्थशास्त्र ( Ocean transport economics ) | X425 |
| छ४२२५ | सागरगति ( Dynamics of oceans ) | H4225 |

परदेश ( Foreign lands )

| | | |
|---|---|---|
| श:५७ | विदेशी विनिमय ( Foreign exchange) | X:57 |
| श७२४५ | विदेशी प्राप्तिकर ( Foreign income tax ) | X7245 |
| श५५५ | विदेशी व्यापार ( Foreign commerce ) | X555 |
| श६२९५ | विदेशी पेढी ( Foreign bank ) | X6295 |
| श७५५ | विदेशी कर्ज ( Foreign debt ) | X755 |
| म:३,५ | विदेशी भाषेच्या अध्यापनाचें तंत्र ( Teaching technique of foreign language ) | T:3,5 |
| म:४१५ | विदेशी भाषेंतून अध्ययन ( Instruction through foreign language medium ) | T:415 |

परदेशीय ( Aliens )

| | | |
|---|---|---|
| स५५ | परदेशस्थ लोक ( aliens ) | Y55 |
| ह,१५५ | परदेशस्थाकरिता कायदा ( Law for aliens ) | Z,155 |

बाह्य ( External )

| | | |
|---|---|---|
| च५५५ | जीवाचें बाह्य इंद्रिय ( external organ ) | G555 |
| ट,५५५ | प्राण्याचें ,, | K,555 |
| ड५५५ | स्त्रीचें ,, | L555 |

परिस्थिति; वातावरण ( Environment )

| | | |
|---|---|---|
| च:५५ | नैसर्गिक वातावरण (Natural environment) | G:55 |

परिस्थितिशास्त्र ( Ecology )

| | | |
|---|---|---|
| च:५ | नैसर्गिक परिस्थितिशास्त्र ( Natural Ecology ) | G:5 |
| ज:५ | वनस्पति परिस्थितिशास्त्र ( Plant Ecology ) | I:5 |
| ट:५ | प्राणि परिस्थितिशास्त्र ( Animal Ecology ) | K:5 |

लोकनियंत्रित योजना ( Public controlled plan )

| | | |
|---|---|---|
| श:५५ | नियंत्रित व्यापार ( Controlled trade ) | X:55 |
| श:७५ | नियंत्रित अर्थयोजना ( Controlled economic plan) | X:75 |

मनोविकार ( Emotion )

| | | |
|---|---|---|
| भ·५ | मनोविकार | S:5 |

सौंदर्यविज्ञान ( Aesthetics )

| | | |
|---|---|---|
| फ५ | सौंदर्यविज्ञान | R5 |

स्त्री ( Woman )

| | | |
|---|---|---|
| श.९१५ | स्त्रीमजूर ( Woman labourer ) | X 915 |
| स१५ | स्त्री समाजशास्त्र ( Woman sociology ) | Y15 |
| स ४५१५ | स्त्रीविरुद्ध गुन्हा ( Crime against woman ) | Y.4515 |
| भ५५ | स्त्रीमानस ( Woman psychology ) | S55 |

स्त्रीपुरुष जाति ( Sex )

| | | |
|---|---|---|
| भ५ | स्त्रीपुरुष जाति मानस ( Sex psychology ) | S5 |
| म५ | स्त्री-पुरुष जातिपरत्वें शिक्षण (Education by sex) | T5 |
| म५५ | स्त्री शिक्षण ( Education of woman ) | T55 |

गुन्हा ( Crime )

| | | |
|---|---|---|
| भ६५ | गुन्हेगाराचें मानस ( Psychology of criminals ) | S65 |
| म६५ | गुन्हेगाराचें शिक्षण ( Education of criminals ) | T65 |
| स.४५ | गुन्हा ( Crime ) | Y 45 |
| ह,५ | गुन्ह्याचा कायदा ( Law of crime ) | Z,5 |

६ हा अक सीमा, परिमाण, आकार, विस्तार ( dimensions ), सूक्ष्म, चतुर, कूट ( subtle ), अध्यात्मविद्या, गूढता, गूढवाद ( mysticism ), धन, अर्थ, द्रव्य, सपत्ति ( money ), उत्पन्न, निधि, धनदौलत, आयशास्त्र ( finance ), अपूर्व, अनैसर्गिक, विचित्र, विलक्षण ( abnormal ), कुलोत्पत्ति ( phylogeny ), परपरा, उत्क्रांति, विकास ( evolution ) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तूना स्मृति-साधन म्हणून वापरण्यात येतो

जसें—

सीमा ( Dimensions )

| | | |
|---|---|---|
| ऊ६ | भूमिति ( Geometry = science of dimensions ) | B6 |

संपत्ति ( Money ) आयशास्त्र ( Finance )

| | | |
|---|---|---|
| श६ | आयशास्त्र ( Finance ) | X6 |
| श:६ | द्रव्यसाधन ( Financing ) | X:6 |
| म:८६ | शिक्षणाकरिता द्रव्य (Finance for education) | T:86 |
| श५६ | द्रव्यसाधनानें व्यापार ( Commerce by finance ) | X56 |

अपूर्व ( Abnormal )

| | | |
|---|---|---|
| भ६ | अपूर्वांचें मानस ( Psychology of Abnormals ) | S6 |
| म६ | अपूर्वांचें शिक्षण ( Education of Abnormals ) | T6 |
| ह,१६ | अपूर्वांकरितां कायदा ( Law for abnormals ) | Z,16 |

कुलोत्पत्ति ( Phylogeny )

| | | |
|---|---|---|
| च:६ | कुलोत्पत्ति ( Phylogeny ) | G:6 |

उत्क्रांति ( Evolution )

| | | |
|---|---|---|
| च:६६ | उत्क्रांति ( Evolution ) | G 66 |

७ हा अंक व्यक्तित्व, स्वत्व (personality), व्यक्तिचरित ( ontogeny ), अखंड एकत्व, अखंडता, पूर्णता, अभंगता ( integrated holism ), मूल्य (value), हिशेब, गणति, वृत्तांत, तपशील (accounts) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान न काल्पनिक सर्व वस्तुंना स्मृतिसाधन म्हणून वापरण्यात येतो.

जसें—

व्यक्तित्व ( Personality )

| | | |
|---|---|---|
| भ:७ | मानसशास्त्रदृष्ट्या व्यक्तित्व ( Personality in Psychology ) | S:7 |
| स:७ | समाजशास्त्रदृष्ट्या व्यक्तित्व ( Personality in sociology ) | Y:7 |

व्यक्तिचरित ( Ontogeny )

| | | |
|---|---|---|
| च:७ | जीवाचें व्यक्तिचरित | G:7 |
| ज ७ | वनस्पतींचें ,, | I:7 |
| ट:७ | प्राण्याचें ,, | K 7 |
| ड.७ | मनुष्याचें ,, | L:7 |

मूल्य ( Value )

| | | |
|---|---|---|
| फ३७ | अध्यात्म मूल्यवाद ( Value as a view in Metaphysics ) | R37 |
| श:७ | अर्थमूल्य ( Value in Economics ) | X:7 |

हिशेब ( Accounts )

| | | |
|---|---|---|
| श:८७ | हिशेब | X:87 |

८ हा अक प्रवास ( travel ), संघटना ( organisation ), पात्रता ( fitness ) आणि इतर वरील लाक्षण्य सदृश विद्यमान व काल्पनिक सर्व वस्तूंना स्मृतिसाधन म्हणून वापरण्यात येतो जसें—

प्रवास ( travel )

| | | |
|---|---|---|
| र८ | प्रवास | U8 |

सघटना, व्यवस्था ( Organisation, Administration )

| | | |
|---|---|---|
| म:८ | शिक्षणाची संघटना ( Educational organisation ) | T:8 |
| ल,८ | राज्यकारभार ( Public administration ) | V,8 |
| म,८ | राज्यकारभारशास्त्र ( Public administration ) | W,8 |
| श ८ | आर्थिक व्यवस्था (Economic management) | X:8 |

वरील विविध उदाहरणावरून ही युक्ति किती मोलाची आहे हें वाचकाच्या सहज लक्षात येईल. ह्या युक्तीचे योजनेमुळें वर्गकाराला पुष्कळच स्वातन्त्र्य लाभलें आहे त्याला ह्या युक्तीच्या साहाय्यानें वर्गीकरणाचार्याचे मार्गदर्शनाशिवाय नवीन नवीन निर्माण होणाऱ्या विविध वर्गांना स्वतन्त्रपणें समाधानकारक वर्गांक तयार करणें शक्य झालें आहे. परंतु ह्या युक्तीचा

उपयोग करणाऱ्या वर्गकाराच्या ज्ञानाची पातळी बरीच उच्च दर्जाची असली पाहिजे व त्याला आवश्यक ती अंतर्दृष्टीहि निर्माण झालेली असली पाहिजे. असा वर्गकार असेल तरच त्याला ह्या योजनेचा चांगला उपयोग करतां येईल. सर्वसाधारण वर्गकाराला हें नेहमींच शक्य होणार नाहीं; परंतु अनुभवानें कांहीं नवीन वर्गांना ह्या युक्तीचे साहाय्यानें वर्गांक ठरवितां येणें संभवनीय आहे.

## वर्णानुक्रम युक्ति
## ( Alphabetical Device )

वर्गाचे जे उपवर्ग असतील त्यांच्या नांवाचें पहिलें, पहिलीं दोन अथवा पहिलीं तीन अक्षरें त्या वर्गाचा जो मूळ वर्गांक असतो त्याचेपुढें योजून उपवर्गांना वर्गांक देण्याच्या युक्तीला वर्णानुक्रम युक्ति ही संज्ञा आहे.

*जेव्हां इतर कोणत्याहि युक्तीनें वर्गाचे उपवर्गांना वर्गांक देणें अशक्य* असेल तेव्हांच ह्या युक्तीचा उपयोग करावयाचा असतो.

उदाहरणें—

' ज्ञ ' कृषिशास्त्र ह्या वर्गांत प्राधान्य युक्तीचा उपयोग केल्यानंतर निरनिराळ्या पिकांचे आणखी आधिक उपवर्ग तयार करण्याकरितां ह्या युक्तीचा उपयोग केला आहे. जसें—

| | |
|---|---|
| ज्ञ३७का काकडी ( Cucumber ) | J37C |
| ज्ञ३७पे पेरू ( Guava) | J37PS |

## अष्टक युक्ति
## ( Octave Device )

वर्गाचे एकाच श्रेणींतील ( Coordinate) अनेक उपवर्ग कालमानानें निर्माण होतात; व त्यांची समानश्रेणी ( Coordinate placing ) वर्गांकांत दाखविणें सुलभ व्हावें आणि असे कितीहि उपवर्ग भविष्यकाळांत निर्माण झाले तरी त्यांना सहजरीतीनें समश्रेणीदर्शक योग्य वर्गांक देतां यावेत म्हणून डॉ. रंगनाथन् यांनीं अष्टकयुक्तीची योजना तयार केली आहे.

ह्या युक्तीप्रमाणें वर्गाचे समानश्रेणींतील एकंदर उपवर्गांची रचना उप-

युक्तेच्या दृष्टीनें त्यांच्या महत्त्वाप्रमाणें करण्यांत येते. ही रचना करण्याकरितां ह्या प्रकरणांत ज्या इतर युक्तींची चर्चा केली आहे त्यांच्यापैकीं कांहींचा गरजेप्रमाणें उपयोग करावा लागतो व कित्येक वेळीं उपवर्गाची रचना रूढिनिष्ठ (Canonical) अशीहि करावी लागते. अशाप्रकारें अस्तित्वांत असलेल्या उपवर्गांची रचना योग्यप्रकारें केली म्हणजे त्याचा क्रम कायम टिकविण्याकरिता वर्गांकाची जी योजना करावी लागते, ती करतांना पहिल्या आठ उपवर्गांना १ ते ८ असें अंक ठरविण्यांत येतात. त्यानंतरच्या आठ उपवर्गांना ९१ ते ९८ असे अंक ठरविण्यांत येतात व पुन्हां पुढील आठ उपवर्गांना ९९१ ते ९९८ असे अंक ठरविण्यात येतात. याचा अर्थ असा कीं, ह्या सर्व उपवर्गांचे आठ-आठचे गट पाडण्यांत येतात. असे गट पुढीलप्रमाणें दाखवितां येतील.—

| | | |
|---|---|---|
| प्रथम अष्टक ( First octave ) | १,२ .... | ७,८ |
| द्वितीय अष्टक ( Second octave ) | ९१,९२ ... | ९७,९८ |
| तृतीय अष्टक ( Third octave ) | ९९१,९९२ ... | ९९७,९९८ |

ह्याप्रमाणें आपणांस कितीहि नवीन समान श्रेणी वर्ग निर्माण करावे लागले तरी ते करणें शक्य आहे. ज्या अष्टकात ९ हा अंक एकदांच येतो त्या अष्टकाला दुसरें अष्टक अशी संज्ञा आहे; कारण पहिल्या अष्टकाचे अंक १ ते ८ आहेत. तिसऱ्या अष्टकांतील अंकांत ९ हा अंक दोन वेळां येतो म्हणून त्या अष्टकाला तिसरें अष्टक अशी संज्ञा आहे. ह्याप्रमाणें अष्टकांच्या श्रेणीप्रमाणें ९ ह्या अंकाची श्रेणी वाढत जाते व इतर अंकांप्रमाणें ९ ह्या अंकाला कांहीं विशिष्ट मूल्य नसून तो केवळ अष्टकदर्शक एक चिन्ह आहे असें आपले लक्षांत येते.

वर जी समान श्रेणींतलि वर्गाच्या रचनेची योजना दिली आहे ती योजना वर्गीकरणाच्या उद्देशाप्रमाणें संबंधित वर्गाच्या अंगभूत विभाजन गुणांचा ( Characteristics = differentiating qualities ) उपयोग करून कृतींत आणण्यांत येते.

उदाहरणार्थ—

ख स्थापत्यशास्त्र ह्या वर्गांतील ख रचना ( Building ) ह्या उपवर्गाचे विभाग अष्टक युक्तीचे साहाय्यानें पुढीलप्रमाणें केले आहेत—

पहिलें अष्टक

१ भूकार्य ( earth work )
२ पाया ( foundations )
३ मजला ( floor )
४ आधार ( supports )
५ जिने ( stair ways )
६ छप्पर ( roofs )
७ खिडक्या ( windows )
८ दारें ( door )

दुसरें अष्टक

९१ घरकाम पाणीपुरवठा (Domestic water supply)
९२ घराचें गटार ( House drainage )
९३ खेळती हवा ( Ventilation )
९४ उष्णता साधन ( Heating ), थंडता साधन ( Cooling )
९५ प्रकाश साधन (Lighting )
९८ स्वच्छता साधनें ( Sanitary fittings )

तिसरें अष्टक

९९६ विजेपासून रक्षण ( Lightning protection )

वरील तिन्हीं अष्टकाचे विभाजन गुण निरनिराळे आहेत. पहिल्या अष्टकाचा विभाजन गुण 'घराचा भाग' (Part), दुसऱ्या अष्टकाचा 'घरातील उपयुक्त साधनें' (Utilities) व तिसऱ्या अष्टकाचा संरक्षण (Protection) असे तिन्हीं अष्टकाचे निरनिराळे विभाजन गुण आहेत. असे निरनिराळ्या अष्टकाचे विभाग करण्यास निरनिराळे विभाजन गुण वापरावे लागतात म्हणून त्यांना विभाजन गुणाची माला ( Trains of Characteristics ) अशी संज्ञा दिली आहे व अशा विभाजन गुणाचे साहाय्यानें जे समान श्रेणीचे विभाग ( Coordinate classes ) निर्माण होतात त्या सर्वांच्या गटाला पंक्ति (Array ) ही संज्ञा दिली आहे.

ह्या उदाहरणावरून ह्या पद्धतींत निरनिराळ्या वर्गांचे समान श्रेणी विभाग

( Coordinate classes ) त्यांच्या अंगभूत विभाजन गुणमालिकांच्या ( Trains of characteristics ) साहाय्याने कसे तयार होतात हें सहज लक्षांत येईल.

कित्येक वेळीं दुसऱ्या अष्टकांतील वर्ग एकाच संज्ञेनें ओळखले जातात. अशा वेळीं त्या संज्ञादर्शक वर्गाला ९ हा अंक ठरविण्यांत येतो. क्वचित् प्रसंगीं अष्टक युक्तीच्या पद्धतीला सोडून उपविभागांच्या योजनेंत थोडा बदल करावा लागतो.

उदाहरणार्थ --

'श' अर्थशास्त्र ह्या वर्गाचे वादविषय ( Problems ) ह्या विभाजन गुणाचे साहाय्यानें जे भाग निर्माण होतात, त्यांतील ९ हा विभाग मजूर ( Labour ) ह्या वर्गाला ठरविला आहे. अशा वेळीं एक स्वतंत्र युक्ति वापरण्यांत येते. ती अशी. ९ ह्या वर्गाचे विभाग ९१ ते ९७ असे पुढीलप्रमाणें ठरविले आहे.

- श:९ मजूर ( labour )
- श:९१ मजूर-पद्धत ( labour-system )
- श:९२ मजूर बाजार ( Labour market )
- श:९३ कसबी व बिनकसबी मजूर ( Skilled and Unskilled labour )
- श:९४ मजुरांचें आरोग्य ( Labour hygiene )
- श:९५ मजुरांचे सेवा निर्बंध ( Service condition )
- श:९६ मजुरांचे संघ ( Trade Unions )
- श:९७ मजुरांचे संप ( Strikes )

वरील विभागानंतर ९८ हा विभाग मजूर ह्या वर्गाच्या नवीन उपवर्गांकरितां मुद्दाम राखून ठेवला आहे. त्याचे पुढें ९८१, ९८२ वगैरे उपविभाग करतां येतील. जसें—

- ९८ सामुदायिक करार ( Collective agreement )
- ९८१ व्यवसाय संबंध ( Industrial relations )

ह्या विभागांनंतर ९९१, ९९२ वगैरे विभाग अर्थशास्त्राच्या वादविषय ह्या

उर्जा मुखाच्या तिसऱ्या पंक्तीच्या ( Third Order Array ) विभागांकरितां वापरावयाचे आहेत.

जेव्हां ९ हा विभाग पहिल्याच अष्टकांत समाविष्ट करण्यानें कांहीं विशेष सोय होते असें वाटतें तेव्हांच अशा प्रकारची तात्पुरती योजना करण्यांत येते.

कित्येक वेळीं वरीलप्रमाणें अंकांचे साहाय्यानें उपविभाग केल्यानंतर पुढील विभाग ( १ ) काल क्रम युक्तीनें ( Chronological Device ) अथवा ( २ ) विषय युक्तीनें ( Subject Device ) करणें सोयीचें असतें; कारण तसे उपविभाग केल्यानें ते आपोआप स्मृतिसुलभ होतात. म्हणून जेव्हां अशा उपविभागांची आवश्यकता भासते तेव्हां अंकांच्या उपविभागांनंतर वर्णांच्या उपविभागांची योजना करण्यांत येते. ह्या वर्णांच्या उपविभागांचे जे वर दोन प्रकार दिले आहेत, त्यांपैकीं कालक्रम युक्तीनें तयार केलेल्या विभागांच्या गटाला अंत्य अष्टक ( Last octave ) अशी संज्ञा देण्यांत येते; व विषय युक्तीच्या गटाला वेष्टित अष्टक ( Packeted octave ) अशी संज्ञा देण्यांत येते.

असे विभाग कित्येक वेळीं ९ ह्या अंकाचे पुढेंसुद्धां ( १ ) कालक्रम युक्तीनें ( Chronological Device ) अथवा ( २ ) विषययुक्तीनें ( Subject Device ) करण्यांत येतात. अशा विभागांपैकीं कालक्रम युक्तीचे साहाय्यानें जे विभाग करण्यांत येतात त्यांना उत्पांत्य अष्टक (Penultimate octave) अशी संज्ञा देण्यांत येते; व विषय युक्तीचे साहाय्यानें जेव्हां असे विभाग करण्यांत येतात तेव्हां त्यांना उपान्त्य वेष्टित अष्टक अशी संज्ञा देण्यांत येते.

अशा विभागांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत--

कालक्रम युक्तीचे साहाय्यानें केलेल्या उपान्त्य अष्टकाच्या विभागांचें उदाहरण पुढीलप्रमाणें आहे--

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ९५१ | 9N1 | संकीर्ण शब्दार्थ विकास विज्ञान; शब्द-विज्ञान (Generalia semantics) |
| ९५२ | 9N2 | तर्कशुद्ध वाक्यरचना विद्या ( Logical syntax ) |
| ९५३ | 9N3 | गणित तत्त्वविद्या ( Principia mathematics ) |

विषय युक्तीचे साहाय्यानें केलेल्या उपान्त्य वेष्टित अष्टकाच्या विभागांचें उदाहरण पुढीलप्रमाणें आहे. —

| | | |
|---|---|---|
| श१(ख) | स्थापत्यव्यवसाय अर्थशास्त्र ( Economics of Engineering ) | X9(D) |
| श१(घ) | रसायनकला व्यवसाय अर्थशास्त्र ( Economics of Chemical Technology ) | X9(F) |
| श१(ज्ञ) | कृषि अर्थशास्त्र (Agricultural Economics) | X9(J) |
| श१(ढ) | उपयुक्त कलांचें अर्थशास्त्र ( Economics of Useful Arts ) | X9(M) |
| श१(ल) | युद्धकाल अर्थशास्त्र ( Wartime Economics ) | X9(V) |

उपान्त्य अष्टकाचे विभाग आणखी एका नवीन युक्तीचे साहाय्यानें करण्याची कल्पना डॉ. रंगनाथन् यांनीं *Annals of Library Science* ह्या नियतकालिकाच्या भाग २, अंक ३, सप्टेंबर १९५५ मध्यें पृष्ट ७२ वर मांडली आहे. ह्या युक्तीला त्यांनीं परिगणन युक्ति ( Device of enumeration ) असें नांव दिलें आहे. ह्या युक्तीची योजना त्यांनीं कांहीं विशिष्ट विषयांकरितां ( Specials ) केलेली आहे; व अशा विषयांच्या गटाला सुद्धां उपान्त्य अष्टकाचा गट त्यांनीं ठरविला आहे. जे उपविभाग एखाद्या वर्गाच्या उपान्त्य अष्टकांत समाविष्ट करण्याजोगे आहेत; परतु ज्यांना कालक्रम युक्तीनें अथवा विषय युक्तीनें वर्गांक तयार करतां येत नाहींत अशा उपविभागांचे वर्गांक तयार करण्याकरितांच ह्या युक्तीचा उपयोग करावयाचा आहे.

ह्या योजनेप्रमाणें रोमी मोठ्या अक्षरांपैकीं I व O हीं अक्षरें सोडून बाकीच्या चोवीस अक्षरांचा उपयोग स्मृतिसाहाय्यक युक्तीनें ( Mnemonic device ) १ ते ८ ह्या अंकांचा जसा उपयोग करण्यांत येतो तसा करावयाचा असें डॉ रंगनाथन् यांनीं सुचविलें आहे. याचा अर्थ असा कीं, ज्याप्रमाणें त्या युक्तींत प्रत्येक अंकाला कांहीं ठराविक अर्थबोधांचीं लाक्षण्यें योजिलीं आहेत तशी लाक्षण्यें रोमी चोवीस अक्षरांना योजावयाचीं आहेत. ह्या योजनेप्रमाणें प्रत्येक अक्षर कांहीं स्मरण साहाय्यक अर्थ संगतीनें ( Mnemonic associations of meaning ) वापरण्यांत येतें.

ह्या युक्तींचा उपयोग करून डॉ. रंगनाथन् यांनीं उपान्त्य अष्टकात समावेश करतां येण्याजोग्या विषयाचीं काहीं उदाहरणें दिलीं आहेत तीं त्याच्या नागरी रूपांतरित वर्गांकासुद्धा पुढें दिलीं आहेत—

क वास्तव C
(Physics)

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नाव |
|---|---|---|
| क९ऊ | C9B | कणवास्तव, सूक्ष्मवास्तव (Microphysics) |
| क९ऊ१ | C9B1 | कण (Molecule) |
| क९ऊ२ | C9B2 | अणु (Atom) |
| क९ऊ३ | C9B3 | परमाणुकेंद्र, अणुगर्भ (Nucleus) |
| क९ख१ | C9D1 | कमी उष्णमान (Low temperature) |
| क९ख८ | C9D8 | अति उष्णमान (High temperature) |
| क९घ१ | C9F1 | कमी शक्ति (Low potential) |
| क९घ८ | C9F8 | अति शक्ति (High potential) |

झ कृषिशास्त्र J
(Agriculture)

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नाव |
|---|---|---|
| झ९ख१ | J9D1 | मृत्तिकानिरहित कृषिकर्म (Soilless farming) |
| झ९ख२ | J9D2 | निर्जल कृषि (Dry farming) |
| झ९घ८ | J9F8 | श्रमपूर्ण कृषि, घनकृषि (Intensive farming) |

ठ पशुविज्ञान λ
(Animal husbandry)

| नागरी वर्गांक | रोमी वर्गांक | विषयाचें नांव |
|---|---|---|
| ठ९ल४.४ | λ9V4:4 | सेना पशु वैद्यक (Army veterinary) |

## दुय्यम छाया युक्ति, पडछाया युक्ति
## ( Auto Bias Device )

एका मुखातील एका वर्गाचा दुसऱ्या वर्गाशीं संबध दाखविणाऱ्या विषयाला योग्य वर्गांक तयार करता यावा म्हणून दुय्यम छाया युक्तीची योजना केली आहे एका विषयाचा त्याच मुखातील दुसऱ्या विषयाशीं संबध येणें म्हणजे एका विषयाची छाया दुसऱ्या विषयावर पडणें असें होतें, म्हणून ह्या युक्तीला मराठींत दुय्यम छाया अगर पडछाया युक्ति संज्ञा समर्पक वाटते.

ह्या युक्तीप्रमाणें पहिल्या विषयाचें बोधचिन्ह लिहिल्यावर आडवी रेघ (–) हे चिन्ह लिहावयाचें व त्यानतर दुसऱ्या विषयाचें बोधचिन्ह लिहावयाचें जसें—

'स' समाजशास्त्र ह्या वर्गाच्या व्यक्तित्व मुखाचे काहीं विभाग पुढील प्रमाणें आहेत.

स११ बालक
स१५ स्त्री
स३१ ग्रामीण ज्ञाति ( Rural community )
स४९ कामकरी वर्ग ( Working class )

समाजशास्त्रात "ग्रामीण बाल" ( Rural child ) व "कामकरी स्त्री" (Working class woman) असेहि विषय असू शकतील अशा विषयाचा वर्गांक तयार करताना पहिल्या विषयाचें बोधचिन्ह प्रथम लिहून त्याचें पुढें आडवी रेघ ( – ) हें दुय्यम छायाद्योतक चिन्ह लिहावयाचें व नतर दुसऱ्या विषयाचें बोधचिन्ह लिहावयाचें जसें--

स११–३१ ग्रामीण बालक
ह्या वर्गांकात
स११ = बालक
– = दुय्यम छायाद्योतक चिह्न
३१ = ग्रामीण ज्ञाति

∴ स११–३१ ह्या वर्गांकाचा अर्थ "ग्रामीण बालक" असा होतो. याचप्रमाणें स १५–४९ ह्या वर्गांकाचा अर्थ 'कामकरी स्त्री' असा होतो

ह्या युक्तीच्या योजनेमुळें एका विषयांतून जे अनेक विषय निर्माण होतात व त्यामुळे एकामागून एक अशा संबंधित विषयांची जी सांखळी (chain) निर्माण होते त्या सांखळीच्या वाढीला विशेष मदत होते. ह्या सांखळींतलि दुवे एखाद्या जिन्याच्या पायऱ्यांप्रमाणें असतात म्हणून तिला निश्रेणी म्हणजे जिना (staircase) ही संस्कृत संज्ञा डॉ. रंगनाथन् यांनीं ठरविली आहे. जिन्याच्या पायऱ्या जशा एका बाजूनें खालीं खालीं उतरत येतात व वरच्या पहिल्या पायरीपासून एकींतून दुसरी, दुसरींतून तिसरी अशा बाहेर आलेल्या आपणास दिसतात; त्याचप्रमाणें एका विषयांतून एकामागून एक असे निर्माण होणारे विषय असतात व अशा विषयांचा एक जिनाच निर्माण झालेला असतो म्हणून ह्या युक्तीला निश्रेणि युक्ति ही संज्ञा समर्पक आहे. अशा उपविषयांच्या पायऱ्या भावी काळांत कितीहि निर्माण झाल्या तरी त्यांना विशिष्ट वर्गांक योग्य प्रकारें देतां यावेत म्हणून डॉ. रंगनाथन् यांनीं दशांश अंक चिन्हांची योजना (Decimal Fraction Notation) व मुखपरिसूत्राची योजना (Facet Formula) यांचा समावेश आपल्या पद्धतींत केला आहे. ह्या योजनांना पोषक अशीच ही तिसरी पडछाया युक्ति आहे. ह्या तिन्ही योजनांमुळें आपणांस आवश्यकतेप्रमाणें नवीन नवीन उपविषयांना योग्य वर्गांक तयार करतां येतात. म्हणून ह्या योजनांनीं ह्या पद्धतीला पराकाष्ठेची निश्रेणि वृद्धि क्षमता (Infinite Hospitality in Chain) प्राप्त करून दिली आहे हें सिद्ध होतें.

---

प्रकरण १४ वें

# आद्य ग्रंथ

## ( Classic )

वाङ्मयामध्यें निरनिराळ्या काळात, निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या भाषेंत कांहीं ठराविक ग्रंथ इतके मौल्यवान निर्माण होतात, कीं अशा ग्रंथापैकीं प्रत्येक ग्रंथ हा एक स्वतंत्र विषय असें मानून त्याचेवर इतर ज्ञानशाखांप्रमाणें बहुविध वाङ्मय निर्माण होतें. अशा ग्रंथाना श्रेष्ठ ग्रंथ, आर्ष ग्रंथ, चिरगहन ग्रंथ अथवा आद्य ग्रंथ ( Classics ) ही संज्ञा आहे. डॉ. रंगनाथन् यांनीं अशा ग्रंथांची इंग्रजींत व्याख्या पुढीलप्रमाणें केली आहे.- "A book which stimulates other books and literature on itself is a classic" "जो ग्रंथ स्वतःवर इतर ग्रंथ व वाङ्मय प्रवृत्त करतो तो आद्य ग्रंथ होय." अशा ग्रंथाना वाङ्मयांत कायमचें स्थान असतें. त्यांचा ग्रंथकार हा एक महान विभूति म्हणून समजला जातो आणि त्या ग्रंथकाराचें व्यक्तिमत्व त्या ग्रंथात ओतप्रोत भरलेलें असतें तो ग्रंथ म्हणजे एक स्वतंत्र महत्त्वाची ज्ञान-शाखाच निर्माण झालेली असते व तिनें एक स्वतंत्र विचारप्रणालीच उद्दीपित केलेली असते.

ज्या ग्रंथकाराचा निदान एकतरी ग्रंथ श्रेष्ठ असतो असा ग्रंथकार श्रेष्ठ ग्रंथकार अथवा आद्य ग्रंथकार ( Classical Author ) होय.

आद्य ग्रंथाच्या निरनिराळ्या आवृत्त्या, त्याच्या प्रत्येक टीकाग्रंथाच्या निरनिराळ्या आवृत्त्या आणि त्याच्या प्रत्येक टीकाग्रंथाचे जे उपटीका ग्रंथ असतात त्याच्या निरनिराळ्या आवृत्त्या एकत्र आणण्याकरितां व प्रत्येक टीकाग्रंथाच्या उपग्रंथाचा जो गट असतो त्याला टीकाग्रंथाशेजारींच स्थान देण्याकरिता, आणि अशा सर्व टीकाग्रंथाच्या गटाला त्याच्या आद्य ग्रंथाशेजारीं स्थान देण्याकरिता आणि अशा प्रत्येक आद्य ग्रंथांचा त्याच्या टीकाग्रंथांसह जो एक गट निर्माण होतो त्या गटाला त्याच वर्गाच्या इतर आद्य ग्रंथाशेजारीं स्थान देण्याकरितां आद्य ग्रंथ युक्तीची ( Classic Device ) योजना केलेली आहे.

ज्या विशिष्ट वर्गांत आद्य ग्रंथाची योजना करणें युक्त असेल अशा वर्गाच्या वर्गांकापुढें शं ( $x$ ) हें बोधचिन्ह लिहावयाचें व त्यानंतर धर्मग्रंथ व ललितवाङ्मय ह्या वर्गाचे ग्रंथ सोडून इतर वर्गांतील आद्य ग्रंथ असेल तर ग्रंथकार मुख व आपणांस त्या ग्रंथकारानें एकच ग्रंथ लिहिला आहे अशी खात्री नसेल तर ग्रंथ मुख यांची योजना करावयाची.

आद्य ग्रंथाच्या वर्गांतील ग्रंथकार मुख व ग्रंथ मुख हीं व्यक्तित्व मुखें होत.

ग्रंथकार मुखांतील पहिल्या सोळा आद्य ग्रंथांचीं बोधचिन्हें प्राधान्य युक्तीप्रमाणें द्यावयाचीं व त्यानंतरच्या ग्रंथकारांचीं बोधचिन्हें कालक्रम युक्तीनें ललितवाङ्मय ह्या मुख्य वर्गांतील ग्रंथकाराच्या बोधचिन्हांप्रमाणें द्यावयाचीं.

ललितवाङ्मयांतील ग्रंथांप्रमाणेंच आद्य ग्रंथांचीं बोधचिन्हें ठरवावयाचीं.

ग्रंथांकानंतर पहिल्या १६ टीकाग्रंथांचे वर्गांक प्राधान्य युक्तीप्रमाणें द्यावयाचे व त्यानंतरच्या ग्रंथांचे ग्रंथांक कालक्रम युक्तीप्रमाणें द्यावयाचे.

द्वितीयश्रेणी टीकाग्रंथ, तृतीयश्रेणी टीकाग्रंथ यांचे बोधांक संबंधित टीका ग्रंथांकाच्या नंतर जोडावयाचे.

सर्व टीकाग्रंथांचीं मुखें व्यक्तित्व मुखें होत.

आद्य ग्रंथांची संख्या संस्कृत वाङ्मयांत बरीच असल्यामुळें त्यांना व त्यांच्या टीकाग्रंथांना स्वतंत्र वर्गांक ठरविणें हा एक फार महत्त्वाचा प्रश्न ह्या आद्य ग्रंथ युक्तीनें उत्तमप्रकारे सोडविला आहे, व ह्या युक्तीचा उपयोग करून जर अशा ग्रंथांची रचना केली तर ती रचना वाचकांना निस्संशय चांगली उपयुक्त होते.

उदाहरणार्थ—

डइशं१,१ चरकसंहिता LAx1,1

वरील वर्गांकाची फोड पुढीलप्रमाणें—

ड = शरीरशास्त्र ( Medicine )

डइ = आयुर्वेद (ह्या वर्गांकांत इ हें बोधचिन्ह आयुर्वेदाचा इ. स. पूर्व २००० हा काळ दर्शवितें )

शं = आद्य ग्रंथ युक्ति दर्शक बोधचिन्ह.

१ = आयुर्वेदाचा पहिला श्रेष्ठ ग्रंथकार चरक याचा प्राधान्य युक्तीनें ठरविलेला बोधांक.

, = व्यक्तित्वदर्शक सयोगचिन्ह.

१ = चरकाचा पहिला ग्रथ.

∴ ३:३१,१ चरकाचा पहिला ग्रथ म्हणजेच चरकसहिता

ह्या ग्रथाच्या पहिल्या टीकाग्रथाचा वर्गांक पुढीलप्रमाणें—

३:३१,१,१ पातञ्जल टीका.

वरील वर्गांकातील शेवटला अक १ हा चरकसहितेवरील पहिली टीका दर्शवितो

ह्याचप्रमाणें इतर आद्य ग्रथाना वर्गांक द्यावयाचे



# प्रकरण १५ वें

# अंगें

## (Phases)

कांहीं विशिष्ट विषय ( Specific subjects ) फक्त एकाच मुख्य वर्गांतून निर्माण होतात; तर कांहीं दोन अथवा अधिक मुख्य वर्गांतून निर्माण होतात. डॉ. रंगनाथन् यांनीं अशा विविध विषयांना योग्य वर्गांक देतां यावेत म्हणून विशिष्ट विषयांचीं निरनिराळीं अंगें ( Phases ) कल्पिलीं आहेत व अशा अंगांना 'Phases' ही इंग्रजी संज्ञा त्यांनीं ठरविली आहे. ह्या संज्ञेची इंग्रजी व्याख्या डॉ. रंगनाथन् यांनीं पुढीलप्रमाणें केली आहे, "A Phase is that constituent of a subject which is derived wholly from a single main class". एकाच मुख्य वर्गांतून निर्माण झालेल्या विषयाचे अंगाला Phase ही संज्ञा आहे. Phase ह्या इंग्रजी संज्ञेला "आश्लेष" ही संस्कृत संज्ञा त्यांनीं ठरविली आहे. ह्या संज्ञेचा मराठी अर्थ 'संबंध' ( Contact ) असा होतो. ह्या मराठी अर्थापासून त्यांनीं जी इंग्रजी व्याख्या दिली आहे त्या व्याख्येंत गर्भित असलेला सर्व अर्थ ह्या शब्दांत नीट दिग्दर्शित होत नसल्यानें ह्या संज्ञेला "अंग" ही संज्ञा मराठीकरितां वापरावी असें वाटल्यावरून तिचा उपयोग येथें केला आहे.

एकाच मुख्य वर्गांतून निर्माण होणाऱ्या विशिष्ट विषयांना एक अंग दाखविणारा विशिष्ट विषय ( One phased specific subject ) अशी संज्ञा आहे. दोन मुख्य वर्गांतून निर्माण होणाऱ्या विशिष्ट विषयांना दोन अंगें दाखविणारा विशिष्ट विषय ( Two phased specific subject ) व दोन पेक्षां अधिक मुख्य वर्गांतून निर्माण होणाऱ्या विशिष्ट विषयांना दोन पेक्षां अधिक अंगें दाखविणारे विशिष्ट विषय ( More than two phased specific subjects ) अशी संज्ञा आहे. या वरून आपले असें लक्षांत येईल कीं, निरनिराळे विशिष्ट विषय निरनिराळीं अंगें दर्शवितात. कांहीं विशिष्ट विषय एकच अंग दर्शवितात; तर कांहीं अनेक अंगें दर्शवितात.

## दृष्टिकोण अंग
## ( Biasing phase )

पहिल्या अंगाचें विवरण ( exposition ) ज्या विषयावर झुकलें आहे ( biased ) तो विषय दुसरें अंग दाखवीत असेल तर त्या अंगाला दृष्टि-कोण अंग अशी संज्ञा आहे. अशाप्रकारचें विवरण केवळ दुसऱ्या अंगानें दाखविलेल्या विषयाच्या तज्ज्ञांकरितां केलेलें असतें.

दृष्टिकोण अंगाला जोडणारे संयोगचिन्ह " ० " ( शून्य ) हें ठरविलें आहे.

दृष्टिकोण अंग दाखविणाऱ्या विशिष्ट विषयाला वर्गांक तयार करण्याच्या युक्तीला दृष्टिकोण युक्ति ( Bias Device ) असें म्हणतात.

उदाहरणार्थ—

गणितावरील पाठ्य ग्रंथांचा वर्गांक " ऊ " हा असेल परंतु त्यांपैकीं कांहीं ग्रंथ वास्तव शास्त्रज्ञांकरितां लिहिलेले असतील; तर कांहीं स्थापत्य शास्त्रज्ञांकरितां लिहिलेले असतील; व कांहीं निसर्गशास्त्रज्ञांकरितां लिहिलेले असतील. अशा विशिष्ट विषयांच्या ग्रंथांचे वर्गांक पुढीलप्रमाणें तयार करतां येतील—

| | | |
|---|---|---|
| ऊ०क | वास्तवशास्त्रज्ञांकरितां गणितशास्त्र ( Mathematics for Physicists ) | BOC |
| ऊ०ख | स्थापत्यशास्त्रज्ञांकरितां गणितशास्त्र ( Mathematics for Engineers ) | BOD |
| ऊ०च | निसर्गशास्त्रज्ञांकरितां गणित शास्त्र ( Mathematics for Biologists ) | BOG |
| ऊ०श | अर्थशास्त्रज्ञांकरितां गणित शास्त्र ( Mathematics for Economists ) | BOX |

असे ग्रंथ जर दृष्टिकोण युक्तीनें निराळे दाखविले नाहींत तर ते गणिताच्या

इतर पाठ्यग्रंथांत मिसळून जातील व ज्या तज्ज्ञांना ते पाहिजे असतील त्यांना ते सहजरीतीनें देतां येणार नाहींत.

आंकडे शास्त्रावरील ( Statistics ) साधारण ग्रंथांना ऊ२८ हा वर्गांक आहे. परंतु अशा ग्रंथांत कांहीं ग्रंथ स्थापत्य शास्त्रज्ञांकरितां असतील; तर कांहीं मानसशास्त्रज्ञांकरितां असतील. अशा ग्रंथांना पुढीलप्रमाणें वर्गांक दिले तर त्यांच्या वाचकांना सहजरीतीनें दाखविणें सुलभ होईल.—

ऊ२८०ख स्थापत्य शास्त्रज्ञांकरितां आंकडे शास्त्र ( Statistics for Engineers ) B280D

ऊ२८०म मानसशास्त्रज्ञांकरितां आंकडे शास्त्र ( Statistics for Psychologists ) B28(S

कालिदासावरील टीकाग्रंथांचा वर्गांक द१५,२ख४०: चं असा असेल. अशा ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथ कालिदासाच्या ग्रंथांतील ज्योतिषाविषयीं माहिती देणारे ग्रंथ असतील; तर कांहीं त्याच्या ग्रंथांतील वेड्यांची माहिती देणारे असतील; कांहीं भाषाशास्त्रदृष्ट्या त्यांचा विचार करणारे असतील; तर आंकडेशास्त्राच्या पद्धतीनें त्यांतील शब्दाचा विचार करणारे कांहीं ग्रंथ असतील. असे टीका ग्रंथ सोयीच्या दृष्टीनें त्यांच्या विशिष्ट गटाप्रमाणें लावून ठेवणें फार आवश्यक आहे; म्हणून त्यांचें वर्गांक दृष्टीकोण युक्तीनें पुढीलप्रमाणें तयार करणें इष्ट आहे.—

| नागरी वर्गांक | | रोमी वर्गांक |
| --- | --- | --- |
| द१५,२ख४०:चं०ऊ९ | कालिदासाच्या ग्रंथांतील ज्योतिषाविषयीं माहिती देणारे ग्रंथ. | O15,2D40:g0B9 |
| द१५,२ख४०:चं०स६३ | कालिदासाच्या ग्रंथांतील वेड्यांचे विषयीं माहिती देणारे ग्रंथ. | O15,2D40:g0Y63 |

| नागरी वर्गांक | | रोमी वर्गांक |
|---|---|---|
| द१५,२ख४०:चं०न | भाषाशास्त्रदृष्ट्या कालिदासाच्या ग्रंथाचा विचार करणारे ग्रंथ. | O15,2D40:g0P |
| द१५,२ख४०:चं०न,३ ०ऊ२८ | आंकडेशास्त्राच्या पद्धतीनें कालिदासाच्या ग्रंथांतील शब्दांचा विचार करणारे ग्रंथ | O15,2D40:g0P,3 0B28 |

वरील शेवटच्या उदाहरणांत दृष्टिकोण युक्तीचा दोनदां उपयोग करावा लागला आहे. अशा वेळीं वर्गांक फार लांब होतो हें खरें आहे. परंतु असा लांब वर्गांक तयार करण्याचे प्रसंग क्वचितच येतात. अशाप्रकारचे फार खोल विषयावर विवरण करणारे ग्रंथ अगदी तुरळक निघतात. मराठी वाङ्मयांत तर अजून असे ग्रंथ निघालेले नाहींत. इंग्रजी वाङ्मयांत असे कांहीं ग्रंथ निघालेले आहेत. वर्गांक कितीहि लांब झाला तरी असे विशिष्ट विषयावरील ग्रंथ इतर ग्रंथात दडून जाऊं नयेत व एकदम निराळे दाखवितां यावेत म्हणून असे विशिष्ट विषयाच्या ग्रंथांना विशिष्ट वर्गांक ( Specific class numbers for specific subjects ) देणें कित्येक वेळीं आवश्यक असतें. द्विबिंदु पद्धतीनें अशा विषयांना देण्यांत येणारे वर्गांक जगांत सध्यां ज्या कांहीं प्रमुख वर्गीकरण पद्धति आहेत त्या पद्धतीनें दिलेल्या वर्गांकापेक्षां बरेच लहान असतात.

## साधन अंग
## ( Tool phase )

विशिष्ट विषयाच्या पहिल्या अंगाच्या विषयावरील विवाद प्रश्नांचा विचार दुसऱ्या अंगांतील विषयाचे साहाय्यानें केलेला असतो; तेव्हां दुसऱ्या अंगाला साधन अंग ( Tool phase ) अशी संज्ञा आहे.

साधन अंगाला जोडणारे संयोगचिन्ह " : " ( द्विबिंदु ) हें ठरविलें आहे.

प्रकरण १६ वें

# इं संकीर्ण ग्रंथ सूचि

## a Generalia Bibliography

ह्या वर्गाचें मुख परिसूत्र पुढीलप्रमाणें आहे.

इ [व्य], [व्य२] [व्य३], [व्य४]

ह्या परिसूत्रात

व्य हें चिन्ह प्रथम तल व्यक्तित्व मुख दर्शवितें ह्या मुखाला साधन मुख (Material Facet) अशी संज्ञा आहे

व्य२ हें चिन्ह द्वितीय तल व्यक्तित्व दर्शवितें. ह्या मुखाला ग्रंथ सूचि प्रकार मुख अशी संज्ञा आहे. (Kind of Bibliography Facet)

व्य३ हें चिन्ह तृतीय तल व्यक्तित्व मुख दर्शवितें. ह्या मुखाला भूभाग मुख अशी संज्ञा आहे. (Area Facet)

व्य४ हें चिन्ह चतुर्थ तल व्यक्तित्व मुख दर्शवितें ह्या मुखाला काल मुख (Date Facet) अशी संज्ञा आहे

प्रथम तल व्यक्तित्व मुखाचे म्हणजे साधन मुखाचे विभाग पुढील प्रमाणें होत —

| | |
|---|---|
| १ | उत्पादनाच्या प्रकाराप्रमाणें (By mode of production) |
| ११ | पट, शिला, ताम्रपट (Tablet) |
| १२ | हस्तलिखित (Manuscript) |
| १२८ | पुरावृत्त (Archive) |
| १३ | ध्वनिग्रंथ, नादग्रंथ (Sound book) |
| १४ | मुद्रित ग्रंथ (Printed book) |
| १५ | प्रकाश-पुनरुत्पत्ति (Photo reproduction) |
| १५१ | सूक्ष्म (Micro) |

१५११ सूक्ष्म-मुद्रा ( Film strip )
१५१२ सूक्ष्म-मुद्रा-पट ( Film roll )
१५२ ऋजुचित्र ( Photostat )
१७ नकाशा ( Map )
१८ उत्थापितमुद्रा ( Raised type )
२ अक्षरांच्या लिपीच्या प्रकाराप्रमाणें ( By script )
३ भाषेप्रमाणें ( By language )
४१ संदर्भ साधन ( Reference material )
४३ नियतकालिक ( Periodical )
४५ वर्तमानपत्र ( Newspaper )
४६ मनरंजनात्मक ( Recreative )
४७ विशेषाधिकार, सनद, हक्क ( Patent )
५ उत्पादनाच्या अधिकारी सत्तेप्रमाणें ( By agency of production )
५५ सरकार ( Government )
५८ खासगी ( Private )
६ प्रकाशनाच्या काळाप्रमाणें ( By age of publication )
६१ पुरातन ( Old )
६६ प्रचलित ( Current )
७ *संस्करणाप्रमाणें ( By edition )*
७१ प्रथम ( First )
७४ निषिद्ध ( Proscribed )
७५ उत्कृष्ट साधनयुक्त ( Deluxe )
७७ स्वाक्षरी ( Autograph )
९५ भाषांतर ( Translation )

इं ह्या संकीर्ण ग्रंथ सूचीच्या बोधचिन्हाला प्रथम तल व्यक्तित्व विभाग जोडले असतां पुढीलप्रमाणें सूचींचे वर्गांक तयार होतात—

१ उत्पादनाच्या प्रकाराप्रमाणें

इं११ ताम्रपट सूचि
इं१२ हस्तलिखितांची सूचि

ई१२८ पुरावृत्तांची सूचि
इ१३ ध्वनिग्रंथांची सूचि
ई१४ मुद्रित ग्रथांची सूचि
ई१५ प्रकाश-पुनरुत्पत्तींची सूचि
ई१५११ सूक्ष्म-मुद्रांची सूचि
ई१५१२ सूक्ष्म-मुद्रा-पटांची सूचि
ई१५२ ऋजुचित्र सूचि
ई१७ नकाशांची सूचि

## २ अक्षरांच्या लिपींच्या प्रकाराप्रमाणें

अमूक एका लिपींत छापलेल्या प्रकाशनांची सूचि असेल तर २ ह्या अक्षरांच्या लिपीच्या प्रकाराच्या बोधचिन्हापुढें निरनिराळ्या भाषाच्या ज्या लिपी आहेत त्या भाषांचे बोधांक भाषाविभाग तक्त्याप्रमाणें लिहावेत म्हणजे त्या लिप्यांमधील प्रकाशनांची सूचि असा अर्थ होईल. जसे.—

इ२१२ रोमी लिपींतील प्रकाशनांची सूचि (ह्या वर्गांकांत १२ हा भाषाविभाग तक्त्याप्रमाणें लॅटिन भाषेचा बोधांक आहे.)
इ२१३ ग्रीक लिपींतील प्रकाशनाची सूचि (ह्या वर्गांकांत १३ हा ग्रीक भाषादर्शक बोधांक आहे.)
ई२१५ नागरी लिपींतलि प्रकाशनाची सूचि (ह्या वर्गांकांत १५ हा संस्कृत भाषादर्शक बोधाक आहे.
ई२२८ अरेबिक लिपींतील प्रकाशनाची सूचि (ह्या वर्गांकांत २८ हा अरेबिक भाषादर्शक बोधांक आहे )
ई२३३ कानडी लिपींतील प्रकाशनांची सूचि (ह्या वर्गांकांत ३३ हा कानडी भाषादर्शक बोधांक आहे.)

## ३ भाषेप्रमाणें

अमूक एका भाषेंतील प्रकाशनाची सूचि असेल तर ३ ह्या भाषा विभाग दर्शक बोधांकापुढें ज्या भाषेंतील ग्रथांची सूचि असेल त्या भाषेचा बोधांक भाषाविभाग तक्त्याप्रमाणें लिहावा म्हणजे त्या भाषेंतलि प्रकाशनांची सूचि असा अर्थ होईल. जसें—

व्यक्तित्व मुखदर्शक स्वल्पविराम ( , ) हें चिन्ह लिहावें व नतर योग्य तो द्वितीय तल व्यक्तित्व अक वापरावा. जसें—

इं१४,१ ठराविक भूभाग विभागातील आणि भूभाग विभागांविषयींच्या मुद्रित ग्रंथाची सूचि.

इं१४,२ ठराविक भूभाग विभागांतील मुद्रित ग्रथाची सूचि.

तृतीय तल व्यक्तित्व मुखाचे विभाग म्हणजे भूभाग विभाग भभाग विभागांच्या तक्त्याप्रमाणें वापरावेत.

जेव्हा द्वितीय तल व्यक्तित्व मुखातील विभाग १ अथवा २ असेल तेव्हां साधारणपणें भूभाग मुखाचा विभाग हा सबंधित देश दर्शक असावा व आवश्यकतेप्रमाणें भूभाग मुखाचा विभाग वाढवावा.

जसें —

इं१४,१२ भारतांतील आणि भारताविषयींच्या मुद्रित ग्रंथांची सूचि.

इ१४,१२३ मुंबई राज्यांतील आणि मुंबई राज्याविषयींच्या मुद्रित ग्रथांची सूचि.

इ१४,२२ भारतातील मुद्रित ग्रंथांची सूचि.

इ१४,२२३ मुंबई राज्यातील मुद्रित ग्रंथांची सूचि.

द्वितीय तल व्यक्तित्व मुखांतील इतर विभागाचे बाबतींत मूळ क्षेत्राच्या भूभाग विभागाचा बोधांक वापरावा.

जसें —

इं१४,३२३ मुंबई राज्याविषयींच्या मुद्रित ग्रथांची सूचि.

इ१४,४२३ मुंबई राज्यातिल ग्रंथालयातील मुद्रित ग्रथाची सूचि.

इ१४,५२३ मुंबई राज्यातील ग्रथविक्रेत्यांनीं तयार केलेली मुद्रित ग्रथांची सूचि.

इ१४,७२३ मुंबई राज्यातील प्रकाशन सस्थांच्या मुद्रित ग्रंथांची सूचि.

### चतुर्थ तल व्यक्तित्व मुख अथवा काल मुख

चतुर्थ तल व्यक्तित्व मुखाचे विभाग म्हणजे काल विभाग, काल विभागाच्या तक्त्याप्रमाणें वापरावेत.

